# फुलांची परडी.






ह्मणजे

मराठींतल्या उत्कृष्ट काव्यांतील बोधपर आणि मनोरंजक

उत्तम उत्तम चुटक्यांचा संग्रह.

विनायक कोंडदेव ओक

ह्यांनीं केला.

तो,

जावजी दादाजी ह्यांनीं आपल्या "निर्णयसागर"
छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

मुंबई.



इ० स० १८८६.

किंमत चार आणे.

# प्रस्तावना.

आमच्या एका जुन्या कवीनें ह्मटलें आहे:—

**श्लोक.**

**कवित्व केलें कविनायकानें**
**परंतु घ्यावा रस पंडितानें**
**झाली पित्यापासुनि रम्य बाळा**
**जो सौख्य भोगी नर तो निराळा.**

ह्मणजे उत्तम काव्य रचणें हें कवींचें काम आहे. आणि त्याचा उपभोग घेणें हें रसिकांचें काम आहे. ह्यापैकीं, आमच्या कवींनीं आपलें काम करून ठेविलें आहे; तें चांगलें झालें आहे. परंतु, रसिकांचें काम अद्याप व्हावें तसें होत नाहीं. त्यास कारण, अभिरुचि नाहीं. ती अभिरुचि लागावी, हा हेतु मनांत धरून, ह्या पुस्तकांतले वेंचे आमच्या प्रिय बांधवांस सादर केले आहेत. हा हेतु परमेश्वरकृपेनें सफल होवो.

# वर्णानुक्रमणिका.

# फुलांची परडी.

## कवितेचा महिमा.

### ओंव्या.

कवित्व असावें निर्मळ कवित्व असावें रसाळ
कवित्व असावें प्रांजळ अन्वयाचें. १.

मृदु मंजुळ कोमळ भव्य अद्भुत विशाळ
गौल्य माधुर्य रसाळ भक्तिरसें. २.

शंका आशंका प्रत्यंतरें नाना वाक्यें शास्त्राधारें
तुटे संशयो निर्धारें निर्धारितां. ३.

जेणें अनुताप उपजे जेणें लौकीक लाजे
जेणें ज्ञान उमजे या नांव कवित्व. ४.

जेणें ज्ञान हें प्रबळे, जेणें वृत्ति ही मावळे
जेणें भक्तिमार्ग कळे या नांव कवित्व. ५.

जेणें देहबुद्धि तुटे जेणें भवसिंधु आटे
जेणें भगवंत प्रगटे या नांव कवित्व. ६.

जेणें सद्बुधि लागे जेणें पाखांड भंगे
जेणें विवेक जागे या नांव कवित्व. ७.

जेणें घडे समाधान जेणें तुटे संसारबंधन
जयास मानिती सज्जन, या नांव कवित्व. ८.

रामदास.

## जिव्हेची प्रार्थना.

### सवाई.

हे रसने तुज वीनवितों कर जोडुनि एक विनंति खरी[1]
सर्व अमान्य जगत्रयदुर्गुण काढुनि होउं नको अखेरी
मूकपणें क्रमुं काळ कसा ह्मणसी तरि निश्चळ ध्यान धरीं
श्रीशिव शंभु दयार्णव केशव माधव कृष्ण मुकुंद हरी. १.
हे रसने तुज सांगितलें हितकाज हरि-स्मरणांत शिरावें
श्रोत्रयुगीं[2] श्रवणादि करूनि कथामृत-सार मनांत धरावें
हस्तकिं पूजन मस्तकिं वंदन नेत्रि विलोकन रूप भरावें
ईश्वर हे समबुद्धि निरखुनि मानुं नको मग आपपरावें[3]. २.

वामनपंडित.

---

## सत्संगाची प्रशंसा.

### आर्या.

सत्संग अतिश्रेष्ठ श्रेयस्कर ह्मणुनि सुज्ञ या गाती
यातें भजतां सिद्धिप्राप्ति असे जी न योगयागा[4] ती. १.
लीलेनें देतो जें संत्संग नता न दे पद पिता तें
जरि राज्य दिलें केलें न च पुत्राचें बरें तदपि तातें. २.
सत्संगति करिताहे लीलालेशेंकरूनि जेंवि हित
न तसें माता जाणे संसारामाजि मात्र जें विहित. ३.
देतो सत्संग जना अमृतकराहूनि[5] शुद्ध सद्यश तें
जें गावें सात्कविंनीं रसिकसभेमाजि गद्यपद्यशतें. ४.

---

१ खोटी–वाईट. २ कानांत. ३ माझें तुझें. ४ समाधि व यज्ञ यांनीं जी सिद्धि प्राप्त होत नाहीं ती सत्संगानें प्राप्त होते. ५ चंद्र.

जीं हरिहरप्रसादीं कल्याणें वसति साधुसंगीं तीं
अघ[1] शमतें सुख गमतें मन रमतें जेंवि दिव्य संगीतीं. ५.
सत्संगमीं च नाना दुःखार्त तथापि चित्त रंगवसे[2].
जलनिधितरंगवातें[3] सत्संगें उठति चित्तरंग[4] तसे. ६.
स्पर्शमणि[5] सुवर्ण करी दे स्पर्शमणित्व तो न लोहातें
हा साधुसंग करितो साधु असाधुसि हरूनि मोहातें. ७.
सत्संगम चिंतामणिमंदिर ऐसें कितेक वदतात
परि न समीचीन[6] दिसे हा देतो जेंवि आत्मपद तात. ८.
सत्संगें स्वच्छ हृदय भस्मानें जेंवि आरसा उटिला
सत्संग सरळ करितो तावुनि वंशा[7] शिखी[8] जसा कुटिला[9]. ९.

मोरोपंत.

---

## कलियुगांतले हरिदास.

### श्लोक.

मुखें ब्रह्मज्ञाना कथिति कर जोडोनि सकळां
जगा दावीती जे कुशळ कविता गायनकळा
स्वयें आशाबद्धें सततचि धनालागिं यजिजे
नव्हे ते गोंसावी विविध जन भोंदू समजिजे. १.
पदें ओंव्या नाना-विविध-पथिंचे श्लोक शिकुनी
कथा कीजे तेणें धन मिळविती लोक ठकुनी
नसे प्रेमा चित्तीं अभिनव महा दाविति जना
असे हे गोंसावी रहित समजा रामभजना. २.

---

१ पाप. २ प्रसन्न होतसे. ३ समुद्राच्या लाटा. ४ ज्ञानकल्लोळ. ५ परिस. ६ चांगलें. ७ वेळू. ८ अग्नि. ९ वांकडा.

भले साधु ज्ञाते निरखुनि तयां द्वेष करिती
सदा गर्वी नीचां नमुनि स्तविजे लौकिकरिती
न लावीती दृष्टी क्षणभरि चिदानंदस्वरुपीं
असे हे गोंसावी उदरभरणाचे बहुरुपी. ३

वामनपंडित

---

## काय काय करूं नये.

### ओंव्या.

अतिवाद करूं नये पोटीं कपट धरूं नये
शोधिल्यावीण वरूं नये कुलहीन कांता. १
वक्तयास खेंदूं नये ऐक्यतेसी फोडूं नये
विद्याभ्यास सोडूं नये कांहीं केल्या. २
क्षणक्षणा रुसों नये लटिका पुरुषार्थ बोलूं नये
केल्यावीण सांगों नये आपुला पराक्रम. ३
सुखा आंग देऊं नये प्रयत्न पुरुषें सांडूं नये
कष्ट करितां त्रासूं नये निरंतर. ४
सभेमध्यें लाजों नये बाष्कळपणें बोलों नये
पैज होडे घालूं नये कांहीं केल्या. ५
कोणाचा उपकार घेऊं नये घेतला तरी राखों नये
परपीडा करूं नये विश्वासघात. ६
समयीं याया चकूं नये सत्वगुण सांडूं नये
वैरीयास दण्डूं नये शरण आलिया. ७

---

१ हिणावूं. २ पर्यंत.

सत्यमार्ग सोडूं नये असत्यपथें जाऊं नये
कदा अभिमान घेऊं नये असत्याचा. ८.
नीच उत्तर साहों नये तोंडीं शिवी असों नये
अप्रमाण वर्तों नये कदा काळीं. ९.
पोटीं चिंता धरूं नये कष्टें खेद मानूं नये
समयीं धीर सोडूं नये कांहीं केल्या. १०.
कठिण शब्द बोलूं नये कठिण आज्ञा करूं नये
कठिणता धरूं नये कोणेविषयीं. ११.
थोरपणें चुकूं नये न्यायनीति सोडूं नये
अप्रमाणें वर्तूं नये कांहीं केल्या. १२.

रामदास.

---

## वैष्णवमाहिमा.

### अभंग.

जयांसी ते नाहीं एकादशीव्रत
जाणावे ते प्रेत शव लोकीं. १.
त्यांचे दिवस नित्य काळ लेखिताहे
रागें दात खाय करकरां. २.
जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन
नाहीं तें स्मशान गृह जाणा. ३.
जया कुळीं नाहीं एकही वैष्णव
तोचि बुडे भवनदीतापीं. ४.
विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड
प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें. ५.

तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय
कीर्तना नवजय हरीचीया. ६.

तुकाराम.

---

## कवनसुमनें.

### आर्या.

ज्या लोकांत खळांचा बहु मान तयांत कोण राहेल
पाहेल बाळ केवळ अनुचित अपमान दगड साहेल. १.

अनुकूल काळ होतो तेव्हां बळ बुद्धि तेज यश देतो
प्रतिकूल तोचि होउनि माघारें दत्त सर्वही घेतो. २.

विसराति अपकारातें उपकारातेंचि साधु आठविती
कीं सोसितां न सा विति होय वपु न सोसितां न आठ विती. ३.

सुजनातें सुखवाया सुयशें वरिती परासुता राजे
निवविति चंदन गंधें छेदूं देती परा सुतारा जे. ४.

पिकला रसाळ उपडुनि त्या स्थानीं लाविला जसा कुचला
सुचला मज मूर्खाला निन्द्य व्यवहार फार हा रुचला. ५.

भूतीं दया असोंद्या व्हा इन्द्रिय-षडरिनिग्रहीं धीट
सोडुनि अन्यपथ धरा निजधर्माचारमार्ग हा नीट. ६.

कर्मीं वसा, नसो पर-मर्मीं लोचन, असो दया धर्मीं
नर्मीं हि मृषोक्ति न यो, शर्मीं नांदा, शिरा क्षमावर्मीं. ७.

कामाची क्रोधाची ज्यांही केली जपोनि आज्ञा ते
चुकले स्वहिता मुकले त्यांतें पाहोनि ह्मणति हा! ज्ञाते. ८.

---

१ साहा. २ मरण. ३ आम्रवृक्ष. ४ क्रीडा. ५ असत्य भाषण. ६ कल्याण. ७ क्षमारूप कवचीं.

मधुप नव्या नलिनीला सोडुनि पहिलीस काय सेवील
कां सद्यः पक्वान्न त्यजुनि रसिक गतरसास जेवील. ९.
नांदे सुखें सदोदित संसारीं तोचि जो अनय[1] न करी
न निभे इतर जन बुडे व्यसनीं पंकीं जसा अनयन[2] करी[3]. १०.
अनुकूल दैव असतां न समर्थ करावयासि हानि यम
होतां तें प्रतिकूल प्रबलहि दुर्बलचि होय हा नियम. ११.
नसतो विवेक कांहीं बा घडतो आत्मघातही कुपितीं[4]
सुपिताहि क्रोधाच्या आवेशें करुनि होतसे कुपिता[5]. १२.
सोडावें कुलजांहीं जीवित समरीं न शस्त्र सोडावें
मोडावें आप्तवचन अयश शरीरार्थ केंवि जोडावें. १३.

मोरोपंत.

---

## दरिद्र्यास वैभव.

सुदाम्यास आपली झोंपडी प्रतिद्वारका झालेली पाहून काय वाटलें, त्याचें वर्णन.

### श्लोक.

माजी मंदिर इंदिरालय दुजें शाळा विशाळा घरें
द्वारीं रत्नमयूख मंडिततरें भोगागरें नागरें
झालें काय ह्मणे अहो घडिघडी माझें तरी झोंपडें
कोठें जाउं बसूं वसूं ह्मणतसे मानी मनीं सांकडें. १.
द्वारांतुनी निरखितां चि कुचैल कांता
कांतास पाहत उठे कुटिलालकांता[6]

---

१ अन्याय. २ अंध. ३ गज. ४ रागें भरलेल्या. ५ दुष्ट पिता.
६ कुटिल अलक अंत–केशांचे अग्रभाग वांकडे आहेत अशी.

कांतारं[1] तें तंव नवे भुललेत कां जी
कां जीवनामृत उपेक्षुनि प्याल कांजी. २.
हे कोण पैं नृपवधूसम दीप्तदेहा
दे हाच कां मज कटा[2] ह्मणुनी वदे हा
दे हाच रात्र करुनी भुलले तराणीं[3]
राणी ह्मणे पुरविली हरिनें शिराणी[4]. ३.
मातें पाहुनि चित्र काय करितां कांपां तुह्मी हो कसे
तों देखे द्विजराज आपण दुजा श्रीकृष्ण झाला असें
माथां मंदिल दिव्य रत्नकटकें हातीं गळां हार ते
तेजःपुंज विराजती दशदिशा तैशा स्वरूपा रते. ४.
आनंदला बहु कुचैल सुचैल झाला
आला भला निज घरासि अपार धाला
आनंदला सम सदा बहु भाग्य लाहे
आनंदनंदन ह्मणे हरिची कृपा हे. ५.

आनंदतनय.

---

## परमेश्वरप्राप्तीचें सोपें साधन.

### अभंग.

राविया[?]नारी माउलीसमान मानिलिया धन काय वेंचे. १.
न करितां परनिंदा अभिलाष काय तुमचें यास वेंचे सांगा. २.
बैसलिये ठायां ह्मणतां रामराम काय होय श्रम तैसें सांगा. ३.
संतांचे वचनीं मानितां विश्वास काय तुमचें यास वेंचे सांगा. ४.

---

१ वन. २ त्रास. ३ तराण्या रागांत. ४ हौस.

खरें बोलतां तें लागती सायास काय वेंचे यास तुमचें सांगा. ५.
तुकाह्मणे देव जोडे याजसाठीं आणिक ते आठी नलगे कांहीं. ६

तुकाराम.

## कठोर भाषण.

### ओंव्या.

बहुकाळींचा मित्रसंबंधु तोडी एक वोखटा शब्दु
जैसा कांजीचा स्वल्प बिंदु घटचि नाशी दुग्धाचा. १.
नानातपाचिया जोडी स्वल्प कामना नासती कोडी
परगृहीं षड्रसांची गोडी दवडी एक हेळणा. २.
ज्वरवन्ही ग्रीष्मातपु याचा उष्मा अत्यंत स्वल्पु
त्याहूनि बोलाचा संतापु आगळा ऐसा मज वाटे. ३.
हृदयीं तप्त लोहाचें सळ साहों येईल चिरकाळ
परी दुष्ट शब्दाची जळजळ मरणांतींही शमेना. ४.
सोनें अथवा हस्तचरण मोडिल्या सांधिती विचक्षण[1]
फुटलें मोंतीं तुटलें मन सांधूं नशके विधाता[2]. ५.

मुक्तेश्वर.

## कवनसुमनें.

### आर्या.

दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी
जोडावी कीर्ति अशी कुलरीति तुह्मीं कधीं न मोडावी. १.
कामें कोपें लोभें नागविले अमित यांस जे भुलले
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी पुरुषहीरही[3] उलले. २.

१ चतुर ( वैद्य ). २ ब्रह्मदेव. ३ पुरुषरूप हिरे.

आजि सिंधुशुक्तिगर्भीं मौक्तिक उपजे नदींत ही असती
पुष्कळ सिंप्या परि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसती. ३.
रक्षावाचि उपेक्षा व्यसनीं अरिचीहि न करिती संत
पाहों नयेचि अंगीं बळ असतां दीन जंतुचा अंत. ४.
स्नेह करी हृष्ट करी तर्पी रक्षी सदैव संमानी
पावे सुखें सुख हि तें मित्र असें ह्मणति सर्वहि ज्ञानी. ५.
मित्र सहज एक दुजें सामें दानेंकरूनि मित्र तिजें
चवथेंहि तें प्रतापें मित्र मिळे सांगताति सन्मति जे. ६.
चुकल्या जनासि कोणी सांगुनि निजहितपथासि जो लावी
धनदेंही[1] उपकृतिशीं[2] त्याच्या निजसंपदा न तोलावी. ७.

मोरोपंत.

---

## प्राकृत ग्रंथांविषयीं.

### ओंव्या.

पर्वतांमाजी कनक मेरु तडागांमाजी क्षीरसागरु
महाराष्ट्रांसी काव्यगुरु हा गौरवु ये ग्रंथीं १.
व्यासवचन इक्षुदंडु गाळूनि सुरस सारांश गोडु
देशभाषां वळिले लाडु नांबदेचे[3] आवडी. २.
ते जैसे सुज्ञीं न सेवणें तैं आग्रहावांचूनि काय ह्मणण
कळंक रेखेस्तव चांदणें काय चकोरीं वाळिजे. ३.
व्यासग्रंथगिरीचें सोनें संस्कृत खोटिये[4] गाळूनि मनें
देशभाषा घडिलें लेणें साहित्य रत्नीं सुजडित. ४.

---

१ कुबेरानें. २ उपकाराशीं. ३ साकरेचें. ४ मूस.

तें लेववितां कर्णभूषण    कांहो परते करावे कान
श्रोतेहो तुह्मी विचक्षण    निर्मत्सर विचारा. ९.

मुक्तेश्वर.

---

## सज्जनांचीं लक्षणें.

### श्लोक.

विपत्कालीं धैर्य प्रभुपणिं साहिष्णुत्व बरवें
सभे पांडित्याचा प्रसर समरीं शौर्य मिरवे
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति विद्या व्यसन जें
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे. १.

वानोत निंदोत सुनीतिमंत
चालो असो वा कमला गृहांत
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं
सन्मार्ग टाकोनि भले न जाती. २.

वांछा सज्जनसंगमीं गुरुकुळीं वंदारुता नम्रता
निंदेचें भय तुष्टता परगुणीं स्वस्त्रीसुखीं लुब्धता
विद्याभ्यास महेशभक्ति खलसंसर्गीं अनासक्तता
चित्ताचा जय या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्वतां. ३.

दे दान गुप्त उपकार करी न बोले
मानी प्रमोद जरि मान्य घरासि आले
दावी न गर्व विभवें गुण घे पराचे
खड्गाग्रतुल्य विषम व्रत हें भल्याचें. ४.

---

१ स्तुति करण्याची इच्छा.

हे तो सत्पुरुष स्वकार्य त्यजिती अन्यार्थ ही साधिती
हे तो मध्यम जे निजार्थ करुनी अन्यार्थ संपादिती
हे तो राक्षस जे स्वकीय विषयीं अन्यार्थ विध्वंसिती
जे कां व्यर्थ पदार्थ हानि करिती ते कोण कीं दुर्मती. ५.

वामनपंडित.

## आर्या.

सुखदुःखप्राप्तीनें कवि हर्षविषादलेश न धरीती
वर्षावर्षीं जेविं न वृद्धिक्षय सिंधु हेचि बुधरीती. ६.
जो सत्याचा वक्ता साधुचि तो यांत संशयचि नाहीं
बहु पूज्य सत्यवादी त्रिजगीं उपमान त्या नसे कांहीं. ७.

मोरोपंत.

---

## सुपुत्र आणि कुपुत्र.

### ओंव्या.

सुपुत्र प्रसूतीं पावे जननी कुपुत्र प्रसवें निघाली कोनीं
एक कुळातें उजळी गुणीं एक तो लावी काळिमा. १.
जो जन्मोनि जनकापोटीं सफल न करवे त्याची गोष्टी
तो जंतुप्राय जन्माला सृष्टीं अनुपयोगी अभाग्य. २.
पिता गुरु पिता देवो पितृसेवे शरीरजावो
ऐसा ज्याचा निश्चयभावो तो एकधन्य सुपुत्र. ३.
अपूर्व तितकें दे आवडी वेंचूं नेणे जोडिली जोडी
बहुकाळ वांचो हे गोडी धरी तो धन्य सुपुत्र. ४.
सर्वस्व वोपी दाराकुमरां दरिद्र भोगवी मातापितरां
त्याचिया भारें उबगे धरा अधमपुत्र ह्मणोनी. ५.

असतें पित्यानें मागतां वस्तु ह्मणे कां तुज नुपजे परमार्थु
जळो तुझा लोभस्वार्थु ऐसें वदे तो कुपुत्र दुरात्मा. ६.
पितृआज्ञेचें उत्तर मोडोनि दे जो प्रत्युत्तर.
पित्यासि ह्मणे मी चतुर तोचि कुपुत्र दुरात्मा. ७.
पित्यानें बोधितां उपदेश ह्मणे तुज झाला बुद्धिभ्रंश
दुष्ट वचनीं उपजवी त्रास तोचि कुपुत्र दुरात्मा. ८.
जित्या नेदी अन्नवसन नेदी स्वल्प धनसन्मान
मेल्या श्राद्धीं शतभोजन तोचि कुपुत्र दुरात्मा. ९.
कुशब्द बोलोनियां उदंड हृदय करी खंडविखंड
मेल्या गये पाडी पिंड तोचि कुपुत्र दुरात्मा. १०.
पिता देखोनि लाजे मनीं अवमान करी सभास्थानीं
जो कंटाळे रोग मरणीं तो एक कुपुत्र दुरात्मा. ११.
जितां भोगवी दरिद्रदुःखा मेल्या रडून दाखवी लोकां
पीडिल्या औषधासि नेदी रुका मेलिया मांडी क्रियेतें. १२.

मुक्तेश्वर.

---

## परोपकार करणें.

### ओंव्या.

जिहीं आपुल्या सर्व यत्नें पराचे क्लेश परिहरणें
श्रमोनि पुढिल्या[1] सुख दावणें तो एक धन्य संसारीं. १.
प्रेरणा न करितां संकटीं कृपेनें अनाथ घाली पोटीं
केला उपकार न बोले वोठीं तो एक धन्य पुरुष. २.

---

१ दुसऱ्यास.

आपल्या सुमान पुढिल्या पाहे पराच्या संतोषें संतोष लाहे
अन्य क्लेशें क्लेशत जाये तो एक धन्य संसारीं. ३.
परोपकारीं करिल्या नसतां विधवासंतती नाशवंता
जैसी नाकावीण वनिता श्लाघ्यता मानीं सौंदर्यें. ४.
परोपकाराविण जे जन ते जाणहीन पाषाण
तनुधनलोभाविष्ट वीण असे माखून सांडिला. ५.
परोपकारावीण समर्थ नरु तो प्रेताचा देह शृंगारु
मांडवा वांचोनि वाद्य गजरु नेता सत्वरू दहनार्थे. ६.

मुक्तेश्वर.

---

## स्वर्गास जाण्याचीं द्वारें.

### ओंव्या.

स्वर्गाचीं सप्त द्वारें संत बोलती निज निर्धारें
जेथें पतनभयाचें वारें लागों न शके सर्वथा. १.
दंभ फळाशा अहंता मानें स्पर्शिलीं दिसती जीं साधनें
तीं तीं देती अधःपतनें फळ हातींचें हिरोनियां. २.
पाहिलें तप दुसरें दान शम दम पांचवी लज्जा जाण
आर्जव सातवें भूषण सर्वां भूतीं अनुकंपा. ३.
इंहीं द्वारीं जो साधक प्रवेशला अक्षयी सुख
अनंत कल्प गेलिया दुःख कर्ण न शिवे तयाचा. ४.

मुक्तेश्वर.

---

१ दुसऱ्याला.

# करुणाष्टक.

## श्लोक.

लोपोनि भास्कर जयद्रथ मारियेला
लज्जानळांतुनि धनंजय वांचवीला
लाक्षागृहीं विवरिं पांडव रक्षियेले
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. १.

दुग्धामिषें द्विजसुतें स्तविला मुरारी
दुग्धार्णवीं अचल ठेविसि पूतनारी
कुब्जेचि भक्ति तरि देखुनि क्षेम दीलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. २.

आणोनि राजतनया अधमें सभेला
दुष्टें करूं सतिस नग्न प्रयत्न केला
तीकारणें स्वकरिं अंबर नेसवीलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ३.

उत्तानपाद नृप केवळ पुण्यराशी
तत्पुत्र तो ध्रुव तपोधन-योग-राशी
त्याकारणें अचळ धाम करोनि दीलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ४.

नक्रें जळांत चरणीं धरिलें गजेंद्रा
म्लानोत्तरें करुनियां स्तवि देव इंद्रा
तैं दीनबंधु ब्रिद सत्वर रक्षियेलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ५.

वृत्रारि[1] कोपुनि शिळाघन वर्षवीला
तेव्हां भयप्रळयकंप गमे जनाला
घेवोनियां गिरि करीं व्रज रक्षियेलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ६.

जे शापदग्ध पडली बहुतां दिसांची
लावूनि पाय हरली जडतां तियेची
त्या भक्तवत्सलपणाप्रति काय झालें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ७.

दुर्योधनें ऋषिंस धाडियलें वनातें
धर्मा छळूनि मुनि मागति भोजनातें
त्याकारणें परम अन्न निशींत दीलें
माझेविशींच मन निष्ठुर केविं केलें. ८.

वामनपंडित.

---

## द्रव्यापासून अनर्थ.

### ओंव्या.

द्रव्यापाशीं अति अनर्थ द्रव्यापाशीं प्राणघात
द्रव्य मिळतांचि विरक्त तरी विषयासक्त तो होय. १.

द्रव्य आशा धरली तरी सखे बन्धु होती वैरी
द्रव्यें मित्र होतसे दूरी विकल्प अंतरीं शिरतसे. २.

द्रव्यापाशीं होतसे कुबुद्धी द्रव्यें भ्रंशे साधकांची बुद्धी
द्रव्यासी चोर जपती आधी प्राणांत संधी ते करिती. ३.

---

1 इंद्र.

द्रव्यासी परचक्राचें भय द्रव्यावानासी राजा नागविताहे
द्रव्यवान संसारिक आहे तरी दरवडा ये तयावरी. ४.
द्रव्य आशा धरितां मन तरी विरक्तांसीं निंदिती जन
द्रव्यप्रतिग्रह घेतांचि जाण तरी पदरींचें पुण्य तें वेंचे. ५.
द्रव्यवानासी चित्तीं तळमळ द्रव्य जतन व्हावयाची हळहळ
द्रव्यवान अतृप्त सर्वकाळ विघ्नदायक सबळ द्रव्याचिं कीं. ६.

मुक्तेश्वर.

---

## म्हातारपणाचें वर्णन.

### ओंव्या.

दशनीं वोस पडलें वदन अंधत्व पावले विशाल नयन
बधिरत्वा पातले सुश्रवण हस्त चरण न चालती. १.
शरीरीं उठला शीघ्र कंपू कमठरूप[1] अवगली वपू
चावरल्या परी वाग्जल्पू अर्थहीन उमजेना. २.
मस्तक स्मश्रु सुनील बाले[2] बकाच्या ऐसे जाहले धवळ
घ्राणीं श्लेष्मा[3] मुखीं लाळ स्रवों लागली झुळझुळां. ३.
चढतां निर्बलतेच्या गुणें धनुष्याकृती आतलें ठाणें
नम्र विनीत मरणा भिणें प्राणदाना बोळगे. ४.
विकार रोगाचे दारुण लागतां कुश्चलतेचा बाण
त्रास मानूनि स्वकीय जन धाकें पळती परौते. ५.

मुक्तेश्वर.

---

१ कांसवा सरखें. २ केंस. ३ शेंबूड.

## बोधामृतसार.

### ओंव्या.

जन्मा आलियाचें फळ कांहीं करावें सफळ
ऐसें न करितां निष्फळ भूमिभार होय. १.

हें कांहींच जो न धरी मनीं तो मृतप्राय वर्ते जनीं
जन्मासि येवूनि तेणें जननी वायांच कष्टविली. २.

आपकार्याहूनि जीवीं परकार्यसिद्धी करावी
मरून कीर्ती उरवावी तो सत्व गुण. ३.

मित्रपणें परहितकारी वाङ्माधुर्यें परशोकापहारी
सामर्थ्यपणें परवेत्रधारी पुरुषार्थें जगन्मित्र. ४.

जीवनाचें झालें अन्न अन्नाचें झालें वमन
परी वमनाचें भोजन करितां नये. ५.

तैसें निंद्य सोडूनि द्यावें वंद्य तें हृदयीं धरावें
सत्कीर्तिनें भरावें भूमंडळ. ६.

उदंड स्थळीं उदंड प्रसंग जाणूनि करणें यथा सांग
प्राणिमात्राचें अंतरंग होऊनि जावें. ७.

चातुर्यें शृंगारे अंतर वस्त्रें शृंगारे शरीर
दोहोंमध्यें कोण सार बरें पहा. ८.

बाह्यात्कारें शृंगारिलें तेणें कां हातीं काय आलें
चातुर्यें बहुतां संरक्षिलें नानापरी. ९.

जो दुसऱ्याचें अंतर जाणे देश काल प्रसंग जाणे
तया पुरुषा काय उणें भूमंडळीं. १०.

श्रेष्ठ कार्य करीतो श्रेष्ठ कृत्रिम करीतो कनिष्ठ
कर्मानुसार प्राणि नष्ट अथवा भले. ११.

धक्के चपेटे सोसावे नीच शब्द सोशीत जावे
पस्तावोन परावे आपले हातीं. १२.

व्याघ्र सिंह भयानक देखोनि भय चाकित होती लोक
परि त्यांचीं पिलें निःशंक तयां पुढें खेळती. १३.

कांहीं मेळवीं मग जेवीं गुंतल्या लोकांस उगवीं
शरीर कारणीं लावीं कांहीं तरी. १४.

मैत्री करितां होतें कृत्य वैर करितां होतो मृत्य
बोलिलों हें सत्य कि असत्य ओळखावें. १५.

जे सत्कीर्तीचे पुरुष ते परमेश्वराचे अंश
धर्मस्थापनेचा हव्यास तेथेंचि वसे. १६.

एक भरे एक रितें रितें मागुतें भरतें
भरतें तेंही रितें होतें काळांतरीं. १७.

शुद्ध सोनें पाहूनि घ्यावें कशीं लावूनि तावावें
श्रवणें मननें जाणावें प्रत्ययासी. १८.

आधीं कष्टाचें दुःख सोशिती ते सुखाचें फळ भोगिती
आधीं आळसें सुखावती त्यांसी पुढें दुःख. १९.

बहुत लोक मिळवावे एक विचारें भरावे
कष्ट करूनी घसरावें म्लेच्छांवरी. २०.

राज्यांमध्यें सकळ लोक सलगी देऊनी करावे साक
लोकांचे मना धाक उपजोंची नये. २१.

आहे तितुकें जतन करावें पुढें आणीक मिळवावें
महाराष्ट्र राज्य करावे जिकडे तिकडे. २२.
अहंमती लोकीं धरावी हिंमतीची तरवार करावी
चढती बढती पदवी पावाल येणें. २३.
शिव राजास आठवावें जीवित्व तृणवत् मानावें
इहलोकीं परलोकीं उरावें कीर्तीरूपें. २४.

रामदास.

---

## कृष्णाची बालक्रीडा.

यशोदेकडे येऊन गोपी गाऱ्हाणीं सांगतात.—

### श्लोक.

कडे तूझिया दीसतो साधु हा गे
बसे उंबरा आमुच्या आणि हांगे
पडे नेणतां पाय वो त्याचि माजी
करी हास्य तेव्हां जनांच्या समाजीं. १.
बरें गोड तें सर्व चोरोनि खातो
कळे ठाव जो नाकळे आणिकां तो
दहीं दूध भक्षूनि दे मर्कटांतें
करूनी तयां तृप्त फोडी घटांतें. २.
हातास याच्या नव जाय कांहीं
केलें असें ज्या गृहिं बायकांहीं
त्यांच्या मुलां ताडण उग्र हातें
करी ह्मणे जाळिन या गृहातें. ३.

घरीं ज्या न हातास कांहींच लागे
करीतो बहू जाच त्यांच्या मुलां गे
रितीं भाजनें फोडुनी कांठमोरे
गळां घालितो आणि घेतो चिमारे. ४.

निद्रितांसि चरणीं तुडवीतो
लेंकुरें उठवुनी रडवीतो
थुंकुनी भरितसे वदनातें
आग लाविन ह्मणे सदनातें. ५.

नाहींच केलें सदनांत कांहीं
ज्या गेहिंच्या कश्मल बायकांहीं
न बिंदु जेथें मज गोरसाचा
न गेह तें दुर्गतिमार्ग साचा. ६.

वामनपंडित.

---

## सुपुत्रप्राप्तीची प्रशंसा.

### ओंव्या.

शरीर जेंसें प्राणाविण तारुण्यावीण पंचबाण
दयेवीण व्यर्थ ज्ञान शांतीवांचून वैराग्य. १.

संपत्ती जैशी धर्मेंवीण पंडितावांचूनि सभा शून्य
स्मरणावीण व्यर्थ ज्ञान दीपावीण मंदिर जेवीं. २.

वेदांतज्ञानावांचून कोरडी व्युत्पत्ती जैशी शून्य
कीं सत्पात्रावांचून दान स्नेहेंवीण बंधु जैसा. ३.

का जळेंवीण वापिका कीं नृपावीण परिवार देखा
कीं नासिकावीण मुखा शोभा जैशी नयेची. ४.

की फळेंवीण तरुवर कीं नामस्मरणावांचूनि मंदिर
तैसा पुत्रांवीण वंश पवित्र सर्वथा पावन नव्हेची. ९.

श्रीधर.

---

## रामजन्मप्रसंगवर्णन.

### श्लोक.

जसें चातकाला घनाचेंच पाणी
स्वभक्तां तसा राम कोदंडपाणी
ह्मणोनी घनश्याम हा राम झाला
जयाकारणें जन्म घेणें अजाला. १.

बुंग बुंग रव[1]तुंग मृदंगीं संगसंग नटती स्वहृदंगीं[2]
अंगभंग बहु दावित रंगीं[3] रामरंग सुखसिंधु तरंगीं. २.

दुमदुम ध्वनि वाजति दुंदुभी
सहित रावण राक्षसवृंद[4] भी
सुख नरां सकळां अमरां महा
प्रगटतांचि रघूत्तम राम हा. ३.

रविकुळांत रघूत्तम राम हा
उपजतां सुख दे अमरां महा
सकळ पूर्ण मनोरथ मेदिनी
करि तयांत अहो प्रथमे दिनीं. ४.

ब्रह्म पूर्ण गुणवैभव लोकीं
जन्मतां मग धरा अवलोकी

---

१ मोठा नाद. २ स्वहृदयरूप अंगांत. ३ नृत्यांत. ४ राक्षस समुदाय.

योग्य लेंकिसे[1] गमे नवरा हो
जो मनीं ह्मणति मानव राहो. ५.

तो न्हाणितां राघव दानवारी[2]
हस्तांत कन्यार्पण-दान-वारी[3]
श्रीभूमि संकल्प करूनि घाली
विवाह तात्काळ करूं निघाली. ६.

आणीक आनंद अपार झाला
कीं लाधलें पार्थिचिया रजाला
ऐशा सुखें राघव जन्मकाळीं
जनासि घाली धरणी सुकाळीं. ७.

तारील पाषाण असें जळाला
वाटे ह्मणे दोष जळो जळाला
तेव्हां तरी तारकशक्ति राम
देईल आह्मांस मनोभिराम[4]. ८.

भयें राक्षसांच्या सदा जो विझाला
स्वयें दीप्त तो अग्नि कुंडांत झाला
ह्मणे अग्नि आला मला पाळणार
ययाऊपरी यज्ञही चालणार. ९.

स्वसुत राघवदास्य सुखें करी
विभव हें अवलोकुनि लौकरी

---

१ सीतेला. २ दैत्यांचा शत्रु. ३ कन्यादानाचें उदक. ४ मनाला अल्हाद करणारा.

पवन घे असि रामसुखें घर्णी
प्रगटतां कपिमारुतिचा धणी. १०.
श्रीरामजन्म समयीं जन राम राम
प्रेमें ह्मणे ध्वनि उठे हृदयाभिराम
आकाश तो निरवकाश सुखेंचि झाला
कीं लोकशब्दकृतताप तयीं निवाला. ११.
असे सर्व भूतांसि हे वेगळाले
दिले सोहळे दोष त्यांचे गळाले
जळें न्हाणितां राम कोदंडपाणी
महादोष गेले ह्मणे आजि वाणी १२.

वामनपंडित.

---

## संतांचीं लक्षणें.

### ओंव्या.

रामउपासक जे संत तयांचीं लक्षणें हींच निश्चित
अमानित्व अदंभित्व अहिंसादि सर्व गुण जेथें. १.
अंतर निग्रह करून शांतिरसें भरलें पूर्ण
आत्मस्तुति मनांतून स्वप्नीं जयां नावडे. २.
दोष गुण दुजयाचे करिती हें कधीं नावडे जयांचे चित्तीं
परांचें उत्तम गुण वानिती न विसंबती कदाही. ३.
गर्व नेणे अणुमात्र कोणासि न बोले निष्ठुर
आपुली निंदा ऐकतां साचार तिरस्कार न उपजेची. ४.

---

१ उपभोग.

जैसे मेघ क्षार जळ प्राशिती परी पृथ्वीवरी गोड वर्षती
धेनु तृण भक्षोनि देती क्षीरामृता सारिखें. ५.
इक्षुकंडासी घालिती खात तरी गोड होय रसभरित
गंगा पाप जाळून देत पुण्य तैसे संत जाणावे. ६.
परिस लोह-काळिमा झांकुन तात्काळ करी सुवर्ण
तैसेच महाराज सज्जन परदोषा न लिंपती. ७.
जैशी कुळवंत कामिनी, अवयव झांकी क्षणोक्षणीं
तैसें आपुलें सुकृत झांकोनी सज्जन जन ठेविती. ८.

श्रीधर

---

## बागेचें वर्णन.

### दिंडी.

पनस जंबू जंबीर विविध निंबें
कुंदचंदन माकंद सुदाडिंबें
तुंग नारिंगें विकसलीं कदंबें
वसति तेथें शुकसारिकाकदंबें. १.

### श्लोक.

लतेतळीं रुंद निरुंद कालवे गळोनि तेथें मकरंद कालवे
परागही सांद्र तयांत रंगती फुलांसवें भृंगतती तरंगती. २.

### आर्या.

उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसाचे
घोंस असे फणसांचे षण्मासांचे कितेक वरसाचे. ३.

रघुनाथ पंडित.

## कटाव.

राजेंद्रा उद्यानाची अद्भुत हे शोभा दिसती. ध्रु०.
फुलझाडांच्या असंख्य पंक्ती, जिकडे तिकडे पुष्पें दिसती,
अनेक रंगी अनेक जाती, लिखितचित्र पटतुल्यभासती,
चाल। जाइ जुई शेवंति मोगरी, पारिजात मोगरा दुहेरी,
शुभ्र कणेरी, लाल केसरी, रायमुनीं नेवाळि मालती,
नाग कुंद मंदार केतकी, मोतिया घमघमित सुवासिक,
बकुल मनोहर, गुलनार गुलदावरि गुलाब,
गुलछबू गुलबासि गुलाली, सोनटका माधवी चमेली,
कमलकंज कल्हार कुशेशय, यापरि पुष्पद्रुमहे फुलले,
नानापरिंचे परिमळ सुटले, पुष्पांचे मकरंद गळाले,
त्यावर मधुकर जाउनि जडले, ते मधुलोभें तेथुनि नुठती,
राजेंद्रा उद्यानाची अद्भुत हे शोभा दिसती.

परशुरामपंत गोडबोले.

## श्लोक.

झाडें पुण्यफळेंकरूनि सुफळें केळीं बरीं पोफळें
नारेळें सजळें विचित्र उजळें हीं सभ्य सीताफळें
तैशीं हीं प्रबळें स्वसंचित बळें जीं तुंबळें जांबळें
पर्ण्पे हीं विमळें अशोक बकुळें कुंदादिकांचीं कुळें १.
पाळीयुक्त तळीं तशीं न सुतळीं स्वर्गीं नवा भूतळीं
वायूतें विमळीं जळीं सकमळीं जों पाळिती शीतळीं
अंतर्बाह्य अली महाशत दळीं भृंगावळी सांवळी
बिंदू त्याच दळीं कसा डळमळी घे पैज मुक्ताफळीं २.

वामनपंडित.

---

## दृष्टांतमहिमा.

### ओंव्या.

मेरू सुंदर रत्नेंकरून कीं नक्षत्रीं मंडित गगन
कीं वृक्ष फळीं परिपूर्ण तैसा दृष्टांतें ग्रंथ शोभे. १.
कीं शांती क्षमा दया विशेष तेणें मंडित सत्पुरुष
कीं परिवार समवेत नरेश दृष्टांत सुरस ग्रंथीं तैसे. २.

श्रीधर.

---

## कशाच्या अगोदर काय.

### ओंव्या.

सूर्या आधीं उगवे अरुण कीं ज्ञानाअगोदर भजन
कीं भजना आधीं वैराग्य पूर्ण तैसा बिभीषण जन्मला. १.
कीं तपा अगोदर शुचित्व पूर्ण कीं बोधा आधीं सत्वगुण
कीं सत्वा आधीं अद्भुत पूर्ण पुण्य जैसें प्रगटलें. २.
कीं साक्षात्कारा आधीं निजध्यास मनना आधीं श्रवण विशेष
श्रवणा आधीं सुरस आवडीपुढें ठसावे. ३.

श्रीधर.

---

## स्वपत्नीस लक्षून दुर्योधनाचें भाषण.

### साक्या.

माझ्या आज्ञेवांचुनि पाउल टाकित नाहींस अशी
मजला पुसल्या वांचुनि बाहिर निघून गेलीस कशी. १.
कांगे मजवरि मनीं प्रिये त्वां ऐसा केला रोष
तुझिया कोपा विषय नव्हे हा लावुं नको मज दोष. २.

## कटाव.

राजेंद्रा उद्यानाची अद्भुत हे शोभा दिसती. ध्रु०.
फुलझाडांच्या असंख्य पंक्ती, जिकडे तिकडे पुष्पें दिसती,
अनेक रंगी अनेक जाती, लिखिताचित्र पटतुल्यभासती,
**चाल ।** जाइ जुई शेवंति मोगरी, पारिजात मोगरा दुहेरी,
शुभ्र कणेरी, लाल केसरी, रायमुनी नेवाळि मालती,
नाग कुंद मंदार केतकी, मोतिया घमघमित सुवासिक,
बकुल मनोहर, गुलनार गुलदावरि गुलाब,
गुलछबू गुलबासि गुलाली, सोनटका माधवी चमेली,
कमलकंज कल्हार कुशेशय, यापरि पुष्पद्रुमहे फुळले,
नानापरिंचे परिमळ सुटले, पुष्पांचे मकरंद गळाले,
त्यावर मधुकर जाउनि जडले, ते मधुलोभें तेथुनि नुठती,
राजेंद्रा उद्यानाची अद्भुत हे शोभा दिसती.

परशुरामपंत गोडबोले.

## श्लोक.

झाडें पुण्यफळेंकरूनि सुफळें केळीं बरीं पोफळें
नारेळें सजळें विचित्र उजळें हीं सभ्य सीताफळें
तैशीं हीं प्रबळें स्वसंचित बळें जीं तुंबळें जांबळें
पष्पें हीं विमळें अशोक बकुळें कुंदादिकांचीं कुळें १.
पाळीयुक्त तळीं तशीं न सुतळीं स्वर्गीं नवा भूतळीं
वायूतें विमळीं जळीं सकमळीं जों पाळिती शीतळीं
अंतर्बाह्य अली महाशत दळीं भृंगावळी सांवळी
बिंदू त्याच दळीं कसा डळमळी घे पैज मुक्ताफळीं २.

वामनपंडित.

## दृष्टांतमहिमा.

### ओंव्या.

मेरू सुंदर रत्नेंकरून कीं नक्षत्रीं मंडित गगन
कीं वृक्ष फळीं परिपूर्ण तैसा दृष्टांतें ग्रंथ शोभे. १.
कीं शांती क्षमा दया विशेष तेणें मंडित सत्पुरुष
कीं परिवार समवेत नरेश दृष्टांत सुरस ग्रंथीं तैसे. २.

श्रीधर.

---

## कशाच्या अगोदर काय.

### ओंव्या.

सूर्या आधीं उगवे अरुण कीं ज्ञानाअगोदर भजन
कीं भजना आधीं वैराग्य पूर्ण तैसा बिभीषण जन्मला. १.
कीं तपा अगोदर शुचित्व पूर्ण कीं बोधा आधीं सत्वगुण
कीं सत्वा आधीं अद्भुत पूर्ण पुण्य जैसें प्रगटलें. २.
कीं साक्षात्कारा आधीं निजध्यास मनना आधीं श्रवण विशेष
श्रवणा आधीं सुरस आवडीपुढें ठसावे. ३.

श्रीधर.

---

## स्वपत्नीस लक्षून दुर्योधनाचें भाषण.

### साक्या.

माझ्या आज्ञेवांचुनि पाउल टाकित नाहींस अशी
मजला पुसल्या वांचुनि बाहिर निघून गेलीस कशी. १.
कांगे मजवरि मनीं प्रिये त्वां ऐसा केला रोष
तुझिया कोपा विषय नव्हे हा लावुं नको मज दोष. २.

काय चुकी मजपासुनि घडली ह्मणुनि मला सोडोनी
निघोनि गेलिस नकळत पुसतों हात तुला जोडोनी. ३.
जें दृढबंधन तवकंठीं म्यां निजभुजपाशें केलें
होतां निद्रावश प्रमादें काय शिथिल तें झालें. ४.
किंवा निद्राभरांत सखये कुशीस वळतां चुकलों
वदन तुजकडे न करुनि पाठी मोरा होउनि निजलों. ५.
अन्य स्त्रीशीं भाषण करितां स्वप्नीं दिसलों तुजला
यास्तव शंका धरून चित्तीं दोष लाविशी मजला. ६.
काय नसें मी तुजवश किंवा न करीं त्वदुदित कांहीं
मीना वनसें तूं मज जीवन दुसरें जाणत नाहीं. ७.
तूं देवी मी भक्त तुझा अपराधा ठेवीं न मनीं
आहे आज्ञांकित दास तुझा तत्पर तुझिया भजनीं. ८.

परशुरामपंत गोडबोले.

---

## नामस्मणाविषयीं बोध.

### श्लोक.

कलियुग चवथें हें दोष सिंधूच सारा
सकलहि नरकाच्या साधनांचा पसारा
परि हरिगुणलीला सत्कथा यांत सारी[1]
त्यजुनि सकळ धंदा कीर्तनीं काळ सारों[2]. १.
गाऊनियां मधुर हें हरिनाम नाचा
पाहों मग भ्रम कसा हरिना मनाचा

१ उत्तम. २ खरचा.

तत्रापि कीर्तनचि मुख्य कलौ करीतो.
होतो तया प्रगट तारक लौकरी तो. २.

कुऱ्हाडीच्या घाया प्रति तरु जसा का तुटतसे
अहो आयुष्याचे दिन रजनि घायें स्फुट तसे
न देहाची ऐशा वय समजतां ऊर उलतो
तया साधे ऐशा कुनर विषयातेंचि भुलतो. ३.

वामन.

---

## अर्जुनाशीं कृष्णाचें भाषण.

परमेश्वराची सेवा केल्यावांचून तर मनुष्यास गत्यंतर नाहीं; आणि परमेश्वराची सेवा करावी तर त्यास कोणत्याही गोष्टीची गरज नाहीं; तर, मनुष्यानें वागावें कसें, ह्याचा विचार ह्यांत आहे.

### श्लोक.

मातें न सेवी नर तो सुटेना
संसारबेडी सहसा तुटेना
सेवा करावी तरि पूर्णकाम
मी काय माझें करणार काम. १.

खरारा खगेंद्रासि माझ्या कराया
न कोणी मला पाहिजे लोकराया
न लागे तया घांस दाणा न पाणी
उभा जो पुढें नित्य जोडोनि पाणी. २.

---

१ कलियुगांत. २ देव. ३ स्पष्ट. ४ मर्यादा. ५ संसारदुःखांतून सुटेना. ६ गरुडाला. ७ अर्जुना. ८ हात.

लगामाविणें माझिया जो लगामीं
विनाज़ीन वाहे मला व्योमगामी[1]
अशा वाहना लागिं तो मानसाची[2]
अपेक्षा नसे गोष्ट हे मानसाची[3]. ३.

ज्ञानांबरें स्वमुख कंचुकि जीस तीचीं
वस्त्रें कशीं धुविल कोण रमे सतीचीं
कीं खेळवूनि उचलील मुला [4]विधीतें
माझ्या करील जन हा कवण्या विधीतें. ४.

मी नित्य तृप्त मज रांधिल अन्न काय
मर्दील अंग तरि केवळ मी अकाय
जो मी अनंत मज रक्षिल तो कसा रे
व्यापोनि जो उरतसें जनलोक सारे. ५.

सेविल्या विण नसे सुटका ही
सेवणें तरि घडे नच कांहीं
सेवुनी सहजही तुज पायें[5]
पांडवा परिस तोचि उपाय. ६.

स्वकृत लौकिक वैदिक पांडवा
मज समर्पुनि तूं कर तांडवा
करिशि होमशि भक्षिशि देशि रे
मजमधेंचि समर्पित[6] तें शिरे. ७.

वामन.

---

१ आकाशांत जाणारा. २ मानससरोवराची. ३ मनाची. ४ ब्रह्मदेव. ५ पावतो. ६ अर्पण केलेलें.

## हृदयभेदक उत्तर.

दासी बुद्धिमतिका इजसहवर्तमान एके समयीं द्रौपदी ही, चालली असतां, तिचे केस मोकळे पाहून, दुर्योधनाची पत्नी भानुमति हिनें, कुचेष्टा करून, तिला विचारलें, "तुझी वेणी अझून मोकळी कां? बांधीत कां नाहींस?" तीस त्या साध्वीनें तर उत्तर दिलें नाहींच; परंतु, तिजकडे वळून बुद्धिमतिका म्हणाली,

### श्लोक.

अझूनि केश तूमचे विमुक्त नाहिं जाहले
बाइ तोंच ही कशी करील बद्ध आपुले
ऐकतांच उत्तरा मनांत फार खोंचली
वाटलें तिला उरीं जणों सुरीच टोंचली. १.

परशुरामपंत गोडबोले.

---

## धनांधाचा उपहास.

### श्लोक.

चिंध्या न सांपडति काय उग्याच वाटे
कंथेनिमित्त जरि शीत तनूस वाटे
ऐसें असोनि ह्मणतो शुक वाक्य कीं कां
ज्ञाते भले भजति दुष्ट धनांध लोकां. १.
अन्नाविणें विकल देह ह्मणाल होतो
भिक्षाशनें भजन हेतु जिताच हो तो
तें तो मिळेचि ह्मणतों शुक वाक्य कीं कां
ज्ञाते भले भजति दुष्ट धनांध लोकां. २.
कोठें मिळे न जरि भैक्ष्यहि या प्रकारीं
बोले तरू नसति काय परोपकारी

ऐसें असोनि ह्मणतो शुक वाक्य कीं कां
ज्ञाते भले भजति दुष्ट धनांध लोकां. ३.

पाणी अगत्य जरि पात्रमिसें अपेक्षा
त्याची भले न धरिती करिती उपेक्षा
कीं आटती शुक ह्मणे न नद्या अहो कां
ज्ञाते भले भजति दुष्ट धनांध लोकां. ४.

राहावया मठगृहादिक तो सजावें
त्या कारणें जरि धनांधगृहासि जावें
कोणीं गुहा शुक ह्मणे न निरोधिल्या कां
ज्ञाते भले भजति दुष्ट धनांध लोकां. ५.

ज्यावीण देह नचले हरि लौकरी तो
दे अर्थ कीं दृढ शरीर असें करीतो
भिक्षाशनादि मग तो स्वमुखेंचि सोशी
ज्याला नसे विषयभोग सुखीं असोशी. ६.

वामन.

---

## देशाचीसंपन्नता.

### ओंव्या.

रोगी दरिद्री नपुंसकू पुरुषामाजी न दिसे एकू
दुःख शोकाचा कळंकू कोणा अंगीं असेना. १.

इच्छिले काळीं वर्षे घन पृथ्वी प्रसवे सकळ धान्य
पुष्पें फळें परिपूर्ण कंद मूळें इत्यादी. २.

औषधी ओपिती अपार रसनिर्यास कर्पूर भार
कुंकुम केशर कस्तूरी फार चंदन नागरु ज्या परी. ३.
शाली तंदुल तांबूलपर्णी[2] पक्क फळीं दिव्य सुवर्णी
दिव्य परिमळाची खाणी घ्राण मापीं न संटे. ४.
अष्टधातु[3] नवही रत्नीं[4] पृथ्वी पिके अनंत गुणीं
वस्त्रें विचित्र नानावर्णीं परिचारिलीं बहुसाल. ५.
धेनु महिषी सर्पि दुग्धें वर्षती सोडून मर्यादे
अरण्य माक्षिका सुस्वादें मधु अपार प्रसवती. ६.
मृग पक्षियां अति संतोष नाहीं पारधीयांचा त्रास
उदीम वाढला चौमास बावन्न वर्णां सारिखा. ७.

मुक्तेश्वर.

---

## भीमास धर्माचें उत्तर.

भीम काम्यवनांत धर्मास युद्धाविषयीं आग्रह करीत असतां, त्यास धर्म बोलला, तें असें:—

---

१ डीक. २ पानवेल.

३ आठ धातु हे आहेत:—

१ सोनें.
२ रुपें.
३ तांबें.
४ कथील.
५ शिसें.
६ पितळ.
७ लोखंड.
८ तिखें.

४ नऊ रत्नें हीं आहेत:—

१ हिरा.
२ माणीक.
३ मोतीं,
४ गोमेद.
५ इंद्रनील.
६ पाच.
७ प्रवाळ (पोंवळें).
८ पुष्कराज.
९ वैडूर्य (तोर्मली).

## आर्या.

प्राणांस तुह्मांसाहि मी त्यजिन न धर्मासि पळहि सोडीन
हें व्रत धर्मचि रक्षू बापा न कदापि अयश जोडीन. १.
बा गा धर्माच्या तो कोंणी सोडूं नयेचि कांसेतें
निष्फळ होती मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें. २.
निजहितकर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं
यापरि पोषण पालन लालन करि जे न अन्य जनकांहीं. ३.
अंभोदास पहाती जैशीं पसरोनि नित्य आ शेतें
धर्मासि तशीं भूतें करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें. ४.
साधु ह्मणति जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा त्या
रक्षी व्यसनीं तदितर जन उदकीं लोष्टसा विरो धात्या[१]. ५.
ह्मणऊनि अनुसरावें सुज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता
पतनार्थ कां अहंत पोषावी गा तशीच कां ममता. ६.

मोरोपंत.

---

## परमेश्वरापाशीं मागणें.

### श्लोक.

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवेकता
नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका. १.
बोलतां चालतां येना कार्यभाग कळेचिना
बहूत पीडिलों लोकीं बुद्धि दे रघुनायका. २.
तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतांपरी
सौख्य तें पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका. ३.

---

१ ब्रह्मदेव.

नेटकें लिहितां येना वाचितां चुकतों सदा.
अर्थ तो सांगतां येना बुद्धि दे रघुनायका. ४

प्रसंग वेळ तर्कानें सुचेना दीर्घ सूचना •
मैत्रिकी राखितां येना बुद्धि दे रघुनायका. ५.

संसार नेटका नाहीं उद्वेगो वाटतो जिवीं
परमार्थू कळेना कीं बुद्धि दे रघुनायका. ६.

उदास वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे
तूं भक्तवत्सला रामा बुद्धि दे रघुनायका. ७.

कायावाचामनोभावें तुझा मी ह्मणवीतसें
हे लाज तुजला माझी बुद्धि दे रघुनायका. ८.

सोडवील्या देव कोटी भूभार फेडिला बळें
भक्तांसि आश्रयो मोठा बुद्धि दे रघुनायका. ९.

भक्त ऊदंड तुह्मांला आह्मांला कोण पूसतें
ब्रीद हें राखणें आधीं बुद्धि दे रघुनायका. १०.

आशा हे लागली मोठी दयाळो बा दया करीं
आणखी नलगे कांहीं बुद्धि दे रघुनायका. ११.

उदंड ऐकिली कीर्ती पतीतपावना प्रभो
मी एक रंक दुर्बुद्धि बुद्धि दे रघुनायका. १२.

रामदास ह्मणे माझा संसार तुज लागला
संशयो लागला पोटीं बुद्धि दे रघुनायका. १३.

रामदास.

## कैकेयीस भरताचें उत्तर.

शोक करकरून दशरथ मरण पावल्यावर, आणि रामलक्ष्मण वनवासास गेल्यावर, राजपदावर बसण्याविषयीं कैकेयी भरतास मोठ्या प्रेमानें सांगूं लागली, तेव्हां तो संतापून म्हणालाः—

### श्लोक.

जाळीन हें तोंडचि जाण आधीं
मुखें जया देसि अनंत आधी
न माय तूं वैरिण होसि साची
माझे मनीं भाव खरा असाची. १.

केला तुवां देखत भर्तृघात
क्षणें ति-वाटा रचिल्या तिघांत
शत्रुघ्न मी लक्ष्मण राम जोडे
राजा तिजा तींस अनर्थ जोडे. २.

गिरिवनाप्रति राम रमापती
दवडिल्यावरि मृत्युमुखीं पती
निजविला मज हे विधवा धरा
ह्मणसि भोग अयोग्य वसुंधरा. ३.

वना धाडिलें जेधवां रामराया
तुवां हेतु केला स्वभर्ता मराया
अहा राम सीता अशा दंपतीतें
वना धाडिलें मारिलें कां पतीतें. ४.

नकळत पतिताचें खादलें अन्न वोकी
तरि पतित नव्हे तो पापरूपें अवो कीं

ह्मणुनि उदरिं तूझ्या देह हा जन्मला गे
त्यजुनि तरि मला हें पाप तूझें न लागे. ५.
मारील सद्य मज खाइन त्या विखातें
कीं पापियास निजपातक जेंवि खातें
तूं पापिणी त्वरित जाशिल रौरवाशीं
होसी सदा निरयदारुणलोकवासी. ६.

वामनपंडित.

---

## समरांगणीं मरणें हेंच सार्थक्य.

युद्ध करून मरणें हेंच श्रेयस्कर, असें स्थापित करण्यासाठीं दुर्योधनानें आपल्या वीरसभेमध्यें भाषण केलें:—

### आर्या.

ध्रुव[1] तो नसेचि कैसा जय कैचें राज्य कीर्ति जोडावी
ती तो युद्धेंचि मिळे ह्मणुनि तनु रणीं गृहीं न सोडावी. १.
तो बहु निंद्य क्षत्रिय जो देउनि पाठ जडतम[2] रणातें
पावे सदा गदार्दित[3] होउनि रडवीत रडत मरणातें. २.
लागे अंतीं हगवण मग वणवासा ज्वर प्रबळ पेटे
नेटे बहु कफ मोही होय गरक नरक-यातना भेटे. ३.
कटु गृहमृति त्या-समजे समरगति वरील यास्तव नरा ज्या
अंतीं सुशस्त्रनिधनें होईल प्राप्त या स्तवन राजा. ४.
वांचेन भोगलोभें तरि जन निंदील मज न वंदील
बंदी[4] लज्जित होतिल साजेल न कटक पदक मंदील. ५.

---

१ कायम. २ अति मूढ. ३ दुखण्यानें व्याप्त. ४ स्तुतिपाठक. ५ कडें.

बहु गेले शोभवुनी स्वर्गाचा मार्ग गगनतळ मळला
प्रियजन समागम जया घडला तो पांथ मग न तळमळला. ६.
समर करूनि मरावें जावें स्वर्गासि हेंचि परम हित:
आह्मी सुरांत होऊं मागें होउत नरांत पर महित. ७.
दुर्योधन वचन असें परिसुनि हतशेष वीर मानवले
बहु साधु साधु वदले ते काळाच्या पुढील कानवले. ८.

मोरोपंत.

---

## कवनसुमनें.

### श्लोक.

ईश्वरें तुज दिली नरकाया
साधनें करिसि तूं नरका या
भोगिशी निशिदिनीं विषयातें
मानिसी न मनिं तूं विष यातें. १.

कृतयुगाहुनि उत्तम हा कली
ह्मणुनि भागवतीं मुनि हाकली
नरतनू अति त्यांत हि जीभली
अजितनाम वदे तरि जी भली. २.

न गर्जती जे हरि गाढ वाचे
ते पापरूपी नर गाढवाचे
न आतळावें अजि त्यांस वाटे
ज्यांच्या मनीं वास न केशवा टे. ३.

हाडि हाडि ह्मणतां हि न राहे
श्वानबुद्धि विषयांत नरा हे

ग्रामसूकर आसा वळखा तो
कीं अमंगळचि केवळ खातो. ४.
लत्ताप्रहार वदनीं अति गाढ वाचा,
हा यत्न गाढविनिमित्तचि गाढवाचा
हाले निमेष इतक्यांतचि भोग झाला
ऐशा सुखें कुनरहो भजणें अजाला. ५.
दास्य दे हरि तुझ्या चरणांचें
कीर्तन श्रवण आचरणाचें
दे अनन्य हृदयीं स्मरणाचें
हें न देशि तरि दे मरणाचें. ६.

वामन.

---

## वैराग्य घेणें कठिण आहे.

गोपीचंद राजानें जालंधरनाथ ह्याजपाशीं वैराग्य मागितलें. तेव्हां, वैराग्य घेणें कठिण आहे, असें त्यानें त्यास सांगितलें, तें असें:—

### ओंव्या.

यावरी गुरु बोलती वचन वैराग्य नव्हे तुजलागून
नको टाकूं संसारभान शेवट होणें अघटित. १.
विष घेववेल ग्रासोग्रासीं पायीं चालवेल आकाशीं
बांहीं पोंहोंनि सागरासीं पैलतीरासि पाववेल. २.
मुठींत धरवेल कृशान कुडीसांडितां धरवेल प्राण
आकाशाची मोट जाण वस्त्रांत बांधून आणवेल .३.
पृथ्वीचें वजन होईल थोडें करवेल ब्रह्मांडाची घडामोड
परी वैराग्य बहुत अवघड जाण रोकडें नृपनाथा; ४.

महीपति.

---

## सुदेष्णा आणि द्रौपदी.

पांडवपत्नी द्रौपदी ही अज्ञातवासाचें वर्ष घालविण्या करितां विराट राजाच्या येथें सैरंध्री होऊन राहिली. तेव्हां, आरंभीं, विराटाची स्त्री सुदेष्णा आणि द्रौपदी ह्यांचें भाषण झालें तें:—

### आर्या.

पाहुनि पुसे सुदेष्णा बाइ कवण तूं अशी दशा कां गे
कृष्णाश्रिता भुजिष्या[1] सैरंध्री[2] मी असें तिला सांगे. १.
राज्ञी ह्मणे पहाया रूप असें ईश्वरीस नवसावें[3]
कोण सचक्षु ह्मणेल स्वगृहीं तुज सुंदरीस न वसावें. २.
परि निश्चयें त्याजिल मज पाहुनि तुज भूप सुकर्मनीयेतें
वाटे विलोकिता जरि हें अद्भुत रूप शुक मनीं येतें. ३.
काय करावें म्यां तरि जारि सुंदरि अनुसरेल पति तूतें
वद कोवें आंवरावी अमृतफलहृता रसज्ञ-मति तूंतें. ४.
दैवें सैरंध्रीपण हें कांहीं काल पातलें पदरा
पांचां गंधर्वांची पत्नी मी पावलें कधीं न दरा. ५
हें वपु परभोग्यं नव्हे जो पुरुष बळेंचि हात लाविल या
पावेल लय ज्योति-स्पृक् जेविं पतंग मातला विलया. ६.
उच्छिष्ट चारितां मज मज करवीं धुववितांहि चरणातें
नरकीं नारी पावे मत्पतिपासूनि सद्य मरणातें. ७.

---

१ दासी. २ शिल्पि काम करणारी स्वतंत्र स्त्री. ३ नवस करावा. ४ डोळस. ५ सुंदर. ६ अमृत फळानें हरण केलेली. ७ तुताच्या फळानें. ८ भय. ९ शरीर. १० दुसऱ्यास भोगण्यास योग्य. ११ ज्योतीला स्पर्श केला आहे असा.

तीतें ह्मणे सुदेष्णा मन्निकट स्वस्थ तूं सये राहें
त्वत्सख्यभाग्य दुर्लभ यावें स्वप्नांत ही न येरा हें.

मोरोपंत.

---

## भ्रम नको; भाव पाहिजे.

### अभंग

अन्नाच्या परिमळें जरी जाय भूक
तरी कांहो पाक घरोघरीं. १.
देखोनी जीवन जरी जाय तान
तरि कां सांठवण घरोघरीं. २.
देखोनियां छाया सुख न पावींजे
जंव न बैसींजे तयातळीं. ३.
सुख तरी होय गातां आईकतां
जरि राहे चित्ता दृढ भाव. ४.
तुका ह्मणे होसी भावेंचि तूं मुक्त
काय करिसि युक्त जाणवेची. ५.

तुकाराम.

---

## धर्मासीं द्रौपदीचें भाषण.

द्वैतवनामध्यें पांडव वनवासास गेल्यानंतर, तेथें, अतिशयित संतापून, द्रौपदी धर्मराजास बोलली, तें असें:—

### आर्या.

द्यूत[1] महाव्यसन असें नायकिलें काय नरवरा[2] कानीं
सर्वस्व हरुनि सहसा केलासि अरण्यचर वरौकानीं[3] १.

---

१ जुगार. २ राजा. ३ नीचांनीं.

श्रोतृ-श्रुति-हर कीं तूं वदता सुविचार-खानि कथा मिकसा
व्यसनांत बुडालास भ्रांत्यासह सुज्ञ जरि तथापि कसा. २.
त्यांसि पहातां कैसें व्याकुळ मानस तुझें नव्हे राया
तुज काय दया यांची प्राणासहि सिद्ध तूं अव्हेराया. ३.
व्यसनप्रसंग तुजही तेजस्विवरासि अंक हा रविला
झालासि दीन वाटे द्यूतीं तोहि प्रताप हारविला. ४.
या दुष्टांप्रति आलें सोडुनि मेल्या दशानना शील
ती कोणा धीराच्या धृतिला माझी दशा न नाशील. ५.
सर्वत्र क्रोध तसा तैशी सर्वत्र न क्षमा साजे
ते कैसे न वधावे तोडिति परघातदक्ष मासा जे. ६.
येऊंद्या कोप मनीं एकिकडे संप्रति क्षमा राहो
कां गोष्पदांत बुडतां यश रक्षा खळ विपक्ष मारा हो. ७.
क्रोध असावा समयीं केवळ वश चित्त न क्षमेला हो.
कोप त्यजिता जरि जमदग्नि धनुर्वेद दक्ष मेला हो. ८.

मोरोपंत.

---

## धौम्यनीति.

धौम्य हा पांडवांचा पुरोहित होता. त्यानें, पांडव अज्ञातवासास निघाले तेव्हां त्यांस नीति सांगितली, ती अशीः—

### ओंव्या.

अग्निहोत्र सामग्रीसीं धौम्य जातां पांचाळ देशीं
नीती सांगे पांडवांसी विराटसंगीं बसावया. १.
नामरूप थोरपण कोणा कळों न द्यावें ज्ञान
दीनाहूनी परमदीन ऐसें लोकां दाखवावें. २.

दाउनी चातुर्य कुशळातें मूर्खत्व नाणिजे प्रभूतें
सृष्टीनें बोलिजे नघडे तें तेचि सृष्टीं प्रतिष्ठा. ३.
असत्य न बोलिजे सर्वथा धरिजे निर्लोभ निर्मळता
इंद्रिय-नियमीं नित्यवसतां तेचि वल्लभ रायातें. ४.
राज-स्त्रीसंवाद राज-मित्रांशीं विरोध
राजपुरोहितासीं विनोद जाणते पुरुषीं न करावा. ५.
राजा अचाट काम सांगे न करवे ह्मणोनी न येइंजे मागें
स्वभाव वळखोनी जो वागे तोचि वल्लभ रायातें. ६.
मागां सरे अंतःपुरीं पुढां ठाके रणचत्वरीं
दिधली आज्ञा वंदी शिरीं तोचि वल्लभ रायातें. ७.
कीजे सर्वांचें आर्जव कोठें नदाखवी वक्रभाव
सर्वांपासोनि गौरव तोचि पावे निर्धारें. ८.
करणी करूनियां लपवी महिमा दुजियाचा वाढवी
महावेषाची तो पदवी आपोआप पावत. ९.
रायें नेमिलिये व्यापारीं सावधान अहोरात्रीं
आळस निद्रा दवडूनि दूरी तोचि रायातें आवडे. १०.
झालिया मानापमान हर्षविषादीं न घाली मन
क्षमाशीळ सुप्रसन्न तोचि पावे महिमेतें. ११.
राज-पैशून्य नायके कानीं राजनिंदा न बोले वदनीं
राज्य-मान्यातें सन्मानी तोचि मान्य नृपातें. १२.
पुसिल्याविणें न करी काज संतुष्ट काळीं नमनीं लाज
राज-गौरवें न चढे माज तोचि पावे महिमेतें. १३.

प्रभूनें बोलविल्या बोलणें प्रभू पुसेल तें सांगणें
न पाचारितां न जाणें तोचि पावे प्रतिष्ठा. १४.
राजासनीं राज-वहनीं राजाचिया एकांतसदनीं
बैसका न करी तो षड्गुणी मान पावे नृपाचा. १५.
आपलें प्रगटूं नेदी ज्ञान नेणत्यातें न ह्मणे जो आज्ञान
ज्याचिये मुखीं मधुर वचन तोचि मान्य विश्वातें. १६.
असो तुह्मां जाणत्यां प्रती काय बोलणें बहुसाळ युक्ती
सांगितलें तया रीती अज्ञातवास क्रमावा. १७.

मुक्तेश्वर.

---

## यतीची अवस्था.

अर्जुनानें यतिवेष घेतला होता, तेव्हां बळरामानें त्यास बोलावून भोजनास बसविला असतां तेथें बळरामाजवळ बसलेल्या सुभद्रेस पाहून त्याची जी अवस्था झाली तिचें वर्णन:—

### आर्या.

यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजांजवळ[1]
न बळे[2] प्रेक्षी परि यति-हस्तींचा पाहतां गळे कवळ[3]. १.
घाली घृतांत[4] सैंधव[5] दुग्धीं जंबीरें[6] पायसीं[8] कथिका[7]
माथि कामशरें[9] जया त्या राम ह्मणे साधु मोक्ष सत्पथिका. २.
आर्यासि निजसुरीती उत्तरदानांत कन्यका यतिला
पाहूनि भुले स्मर तो रति ती दृष्टांत अन्य काय तिला. ३.
जीच्या निवृत्तिनें वश केला अर्धांच सर्ववीरमणी

---

१ आपल्या भावाजवळ. २ बळराम. ३ घांस. ४ तूप. ५ मीठ. ६ निंबू. ७ कढी. ८ खीर. ९ मदन.

त्यास कटाक्षप्रेक्षण बाणीं मोहील कां न ती रमणी. ८.
कन्यारत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर
घोर-प्रताप परि भी भीमानुज कीं अनंतबळ थोर. ९.

मोरोपंत.

---

## चोराच्या मनाची स्थिति.

मृच्छकटिक नाटकामध्यें शर्विलक हा घरफोड्या चोर आपल्या रात्रीच्या स्थितीचें वर्णन करितोः—

### श्लोक.

रात्रीला दिधलीच लाज कृतिनें[1] निद्रेसही जिंकिलें
राजाचे बहु दक्ष रक्षक तयां जिंकोनि म्यां टाकिलें
हीं कर्मे करितां सरोनि अवघी गेली निशा[2] सत्वरी
झालों मी सहसा रवी उगवतां निस्तेज चंद्रापरी. १.
वाटे[3] चालत कोणि येत असतां आला पहाया मला
कोणी धांवत शीघ्र येत असतां पाठीस हा लागला
माझें दूषित चित्त यास्तव भयें ऐशा करी कल्पना
दोषांहीं अपुल्याच निश्चित अशा येतात शंका मना. २.
गोष्टी सांगत बैसले नर जिथें तें गेहं[4] म्यां सोडिलें
स्त्रीचें ज्या स्थलिं आधिपत्य दिसलें तेंही असे टाकिलें
झालों स्तंभसमान[5] मी नृपतिचे पाहोनियां किंकर[7]
क्लेशाचे व्यवसाय[6] सारुनि असे केली निशा वासर[8]. ३.

परशुरामपंत गोडबोले.

---

१ उद्योगानें. २ रात्र. ३ वाटेनें. ४ घर. ५ खांबासारखा. ६ उद्योग. ७ चाकर. ८ दिवस.

# अधमनीति.

धृतराष्ट्राच्या प्रधानांमध्यें कणिक ह्या नांवाचा एक पुरुष होता. त्यानें पांडवांशीं कपटानें आणि वैरभावानें वागण्याविषयीं धृतराष्ट्राला जें कांहीं सांगितलें, तें अति विचित्र आहे, तें हें:—

## ओंव्या.

गुह्य आपुलें गौप्य करणें छिद्र पराचें अवलोकणें
तेंचि निमित्त करोनि तेणें मग अपाय चिंतावा. १.
कृत्रिमें दावूनि मित्रधर्म शोधोनि ठायीं पाहावें वर्म
आपुलें अंग लपवी कूर्म तेवीं स्वदोष झांकावे. २.
शोधिजे परबुद्धीचा ठाव कळों नेदी आपुला भाव
स्वार्थ साधे तो उपाव नाना यत्नीं साधावा. ३.
घालुनि अकीर्तीची माळा न धरून पापाचा कंटाळा
राहटीं दावूनि जना सकळा भय उपजविजे अपार. ४.
तोचि संपत्तीचा समुद्र येरा न सोडी दरिद्र
जे कां विचार बुद्धीचे क्षुद्र थिल्लरहातें डहुळती. ५.
दया आर्जव साधुवृत्ति वर्ततां वदनीं पडे माती
कवडीही परी न लभे हातीं तळमळ चित्तीं शमेना. ६.
घेइंजे इतरांचें मनोगत न दीजे कोणा हातीं चित्त
ईश्वरही झालिया प्राप्त विश्वास तेथें न धरावा. ७.
अगा राया स्वार्थविषयीं शुद्धत्व न दिसे कवणे ठायीं
ऐसें जाणोनियां हृदयीं विश्वास कोठें न धरावा. ८.
पिता पुत्र अथवा बंधु शत्रूच्यापरीं पाववी खेदू
त्याचा न विचारितां वधू नाना यत्नीं करावा. ९.

ज्याचेनि साधे इच्छित अर्थू तोचि मानिजे जवळील आप्तु
अपाय चिंती तो अनाप्तु निकट वसों न द्यावा. १०.
क्षेत्रालागीं कंटकावरण तस्करालागीं पाळिजे श्वान
शोधावया शत्रूचें न्यून खळ दुर्जन रक्षावे. ११.
पाटा चूर्ण करी तें काम करूं न शके शाळिग्राम
यतिहस्तींचा दंड उत्तम रवी नोव्हे घुसळावया. १२.

मुक्तेश्वर.

---

## काळ फिरल्याचीं लक्षणें.

### ओंव्या.

ईश्वर झालिया पाठमोरा नसतीं विघ्नें येती घरा
महारत्नें होती गारा न पुसे कोणी तयांते. १.
आपुलें द्रव्य लोकांवरी बुडोनि जाय न लाभे करीं
ज्यांचें घ्यावें ते द्वारीं बैसती आण घालोनी. २.
वैरियाकरीं सांपडे वर्म आळस येऊनि बुडे धर्म
विशेष वाढे क्रोध काम तरी देव क्षोभला जाणिजे. ३.
आपुले जे कां शत्रु पूर्ण त्यांस आपण पीडिलें दारुण
अडल्या धरणें त्याचे चरण तरी देवक्षोभ जाणिजे. ४.
लाभाकारणें निघे उदिमास तों हानीच होय दिवसें दिवस
पूज्यस्थानीं अपमान विशेष तरी देवक्षोभ जाणिजे. ५.
आपली स्त्री राज्य धन शत्रू भोगूं पाहे आपण
देहीं पीडिला व्याधि पूर्ण तरी देवक्षोभ जाणिजे. ६.
विद्या जवळी बहुत असे बोलूं जातां मती भ्रंशे
कोणी तयासी न पुसे तरी देवक्षोभ जाणिजे. ७.

ठेविला ठेवा न सांपडे नसतीच व्याधि आंगा जडे
सदा भय वाटे चहूंकडे तरी देवक्षोभ जाणिजे. ८.
वृद्धपणीं येई दरिद्र स्त्री मृत्यु पावे गेले नेत्र
हेळसूनि उपेक्षिती पुत्र तरी देवक्षोभ जाणिजे. ९.

श्रीधर.

---

## धृतराष्ट्राचा पुत्रशोक.

### आर्या.

सावध दीनहि होऊनि अंध[1] ह्मणे संजया कसें साहूं
राहूं परवश होउनि कैसा कोणास सांग मी बोहूं[2]. १.
पांच न मेले मेले त्यांहुनि बहु सुकर बाळ वीसपट[3]
या चिंतेसि मदात्मा सांपडला सुकर[4] वाळवीस पट. २.
जे अल्प[5] अल्पबळ[6] रिपु झाले जयपात्र तेचि उरफाटे
शतसुतशोकें[7] न तसें पांडवकुशलेंचि[8] फार उर फाटे. ३.
अंधपण बरें अरिंच्या[9] केव्हां तरि पाहतोंचि तोंडास
घेतोचि काळिजाचा हत-शत-सुत-शोक-सर्प[10] तो डास. ४.
मज अजिनें[11] जीर्ण वल्कल[12] बहु मत या शत्रुचें नवें[13] न वसि[14]
वनवास बहु बरा या दुष्टाचा छळ नको भवनें[15]-वास. ५.

मोरोपंत.

---

१ धृतराष्ट्र. २ बोलावूं. ३ शंभर. ४ सहज. ५ थोडे. ६ अशक्त. ७ शंभर पुत्र मेल्याच्या दुःखानें. ८ पांडवांचें कल्याण. ९ शत्रूंच्या. १० मेलेल्या शंभर पुत्रांचा शोक हा सर्प. ११ चर्म. १२ वृक्षाची साल. १३ नवीन. १४ वस्त्र. १५ घरीं राहणें.

## रामनीति.

राज्य शत्रुघ्नाच्या स्वाधीन करून राम वनवासास निघाले, तेव्हां त्यांनीं त्यास नीति सांगितली, ती अशी:—

### ओंव्या.

शत्रुघ्नासि ह्मणे रघुनाथ तूं आणि प्रधान सुमंत
राज्यभार चालवा समस्त यथान्यायें करोनियां. १.
सदा स्तवावे संत सज्जन श्रीगुरुभजनीं सावधान
दूर त्यागावे दुर्जन त्यांचें अवलोकन न करावें. २.
परदारा आणि परधन तेथें कदा न ठेविजे मन
वेदमर्यादा नुलंघावी पूर्ण प्राणांतही झालिया. ३.
जरी क्लेशकाळ पातला बहुत तरी धैर्य न सोडावें यथार्थ
गुरुभजन पुण्यपंथ न सोडावा सर्वथा. ४.
साधुसंत गोब्राह्मण त्यांचें सदा करावें पाळण
सकळ दुष्टांस दवडोन स्वधर्म पूर्ण रक्षावा. ५.
कथाकीर्तन पुराणश्रवण काळ क्रमावा येणेंकरून
अपुला वर्णाश्रमधर्म पूर्ण सर्वथाही न त्यजावा. ६.
संतांचा न करावा मानभंग हरिभजनीं झिजवावें अंग
सांडोनि सर्व कुमार्ग सन्मार्गेंचि वर्तावें. ७.
ऋषींचे आशीर्वाद घ्यावे वर्म कोणाचें न बोलावें
विश्व अवघें जाणावें आत्मरूपी निर्धारें. ८.
सत्संग धरावा आधीं नायकावी दुर्जनाची बुद्धि
कामक्रोधादिक वादी दमवावे निजपराक्रमें. ९.
मी झालों सज्ञान सज्ञान हा न करावा अभिमान
विनोदेंही पराचें छळण न करावें सहसाही. १०.

शमदमादिक साधनें दूर न करावीं साधकानें
जन जाती आडवाटेनें त्यांस सुमार्ग दाविंजे. ११.
कामक्रोधमदमत्सर हे गृहासीं येऊं न द्यावे तस्कर
आयुष्य क्षणिक जाणोनि साचार सारासार विचारावें. १२.
क्षणेक जाणोनि संसार सोडावा विषयावरील आदर
सद्गुरुवचनीं सादर सदा चित्त ठेविंजे. १३.
दैवें आलें भाग्य थोर त्याचा गर्व न धरावा अणुमात्र
एकदांचि गेलें जरी समग्र कदां धीर न सांडावा. १४.

श्रीधर.

---

## वर्तनक्रमबोध.

### ओंव्या.

उदंडांचें उदंड ऐकावें परी तें प्रत्ययें पाहावें
खरें खोटें निवडावें अंतर्यामीं. १.
वेडे करावे शाहाणे तरीच जिणें श्लाघ्यवाणें
उगेंच वादांग वाढविणें हें मूर्खपण. २.
मिळोनि जाऊनि मिळवावें परी घेऊनि उलथावें
कांहींच कळों न द्यावें विवेकबळें. ३.
दुसऱ्यांचे चालीं चालावें दुसऱ्यांचे बोलीं बोलावें
दुसऱ्यांच्या मनोगतीं जावें मिळोनियां. ४.
जो दुसऱ्याच्या हितावरी तो विपट कांहींच न करी
मानत मानत विवरी अंतर तयाचें. ५.
आधीं अंतर हातीं घ्यावें मग हळूहळू उकलावें
नाना उपायें न्यावें परलोकासी. ६.

घक्के चपेटे सोसावे नीच शब्द सोशीत जावे
पस्तावोन परावे आपले होती. ७.
प्रसंग जाणोनि बोलावें जाणपण कांहींच न घ्यावें
लीनता धरोनि जावें जेथें तेथें. ८.
कुग्रामें अथवा नगरें पाहावीं घरांचीं घरें
भिक्षामिसें लहान थोरें परीक्षून सोडावीं. ९.
बहुतीं कांहीं तरी सांपडे विचक्षण लोकीं मैत्री घडे
उगेंच बसतां कांहींच न घडे फिरणें विवरणें. १०.
सावधपणें सर्व जाणावें वर्तमान आधींच घ्यावें
जाऊं नये तिकडे जावें विवेकेंसहित. ११.
नाना जिन्नस पाठांतरें निवारी सकळांचीं अंतरें
लेहोनि देतां परोपकारें सीमा सांडावी. १२.
जैसें जयास पाहिजे तैसें तयास दीजे
तरी मग श्रेष्ठ होईजे सकळां मान्य. १३.
भूमंडळीं सकळांस मान्य तो ह्मणूं नये सामान्य
कित्येक लोक अनन्य तया पुरुषासी. १४.

रामदास.

---

## विवाहोत्सव.

दमयंतीचा विवाह नळ राजाशीं झाला तेव्हांच्या आनंदाचें वर्णन:-

### श्लोक.

मावेचना सुख मनीं कमनीय[1] बाळी[2]
मायेसही[3] विसरली न पुसेचि बाळीं[4]

---

1 सुंदर. २ मुलगी. ३ आई. ४ बाप.

दूर्वादळीं[1] कदळिबंध[2] मधूक-माळा
तेणें अलंकृत करी नळकंठनाळा. १.
नृपाळाचे मांडीवरि बसुनि
मांडीं हरिख ते
तयां पाहों आले जन सकळ
झाले हरिखते[3]
महावाद्यें नाना निनदहि त-
नाना मग घडे
पिता तीचा पांटी भरहि धन
वांटी बहु विडे. २.

ओव्या.

नानापरीचें मिष्टान्न चारी दिवस भोजन
वधूवरें मिरवून घरभरणी करविली. ३.
राजा निरोपातें घेत मग दमयंतीसमवेत
आपल्या नगरातें जात नांदे आनंभरें. ४.

रघुनाथ पंडित.

---

## शल्याची समजाविशी.

दुर्योधनानें शल्यास कर्णाचा सारथी होण्याविषयीं विनंति केली, तेव्हां त्यास क्रोध येऊन त्यानें दुर्योधनास म्हटलें:—

आर्या.

करिसी बहु प्रशंसा या नरवरमंडळांत[4] कर्णाची
सांगशि सारथ्याची पदवी मजलागिं हीन वर्णाची[5]. १.

---

१ दूर्वांनीं युक्त. २ केळीच्या दोरानें गुंफलेली मधूक (दुपारी) फुलांची माळ. ३ अनंदित. ४ राज्यांच्या मंडळींत. ५ जातीची.

सिंहासनोचितालाँ[1] मज सारथ्याधिकार हा नीच
इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच. २.
युद्धीं दुर्बळ मी हें गमलें तुज ह्मणवुनीच भूपा हें
सारथ्य योजिलें तरि दे दावुनि भाग शक्ति तूं पाहें. ३.
भूमि विदारीन शरें तेजें शोषीन वारिराशी[2] खरी
गोष्टि तुला कथितों मी पिष्ट करिन कौरवेश्वरा शिखरी[3]. ४.
ऐसा मी त्या मजला नीचाची काय सांगसी सेवा
नीचोच्चवैपरीत्यें[4] पापाला पात्र होसि कां देवा. ५.
जातों गृहासि झालों कृतकृत्य प्राप्त मोक्षसम यज्ञ
प्रेक्षुनि झालों कीं तूं धृतराष्ट्र-सुता गुणज्ञ समयज्ञ. ६.

हें ऐकून, दुर्योधन शल्याजवळ जाऊन, नम्रपणानें म्हणाला:—

## आर्या.

शत्रूच्या हृदयीं तूं शल्य ह्मणुनि शल्य ह्मणति तुज राया
कुब्जेसि कृष्णसा तूं पटु मज्जयसिद्धिलागिं उजराया[5]. ७.
बहु विक्रम[6] कर्णाचा न्यून पराक्रम तुझा असें न मनीं
असतें जरि तरि माझें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं. ८.
कर्णाहुनि मजहुनि तूं अधिक अधिक यादवाधिपाहूनी
व्हावें प्रभो वरप्रद मज आजि पराभवाधि पाहूनी. ९.
पार्थाहुनि कृष्णाला कृष्णाहुनि अधिक जाणतों तुजला
जयवांछा पुरवीं हो सारथि हा जन न पाहिजे सुजला. १०.

---

१ सिंहासनावर बसण्यास योग्य. २ समुद्र. ३ पर्वत. ४ हलका आणि मोठा ह्यांच्या विपरीतपणानें. ५ उदयास आणायास. ६ पराक्रम.

हयहृदय कृष्ण जाणे त्याहुनि तूं द्विगुण जाणसी माम्या
भुज युद्धीं हि परिसिली न बळासि तुझीच आण सीमा म्यां. ११.
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं ह्मणोनि सारथितः
स्वगुण न लोपीं प्रकटीं वरिली विधिनेंहि शंभुसारथिता. १२.
शल्य ह्मणे राया मज राजसमूहांत हात जोडूनी
ह्मणसी कृष्णाधिक हें दुर्लभ यश जात नाहिं सोडूनी. १३.
झालों प्रसन्न तुज मी वर देतों घे करीन सारथ्य
पथ्य अपथ्य न ह्मणतां परि परिसावें मदुक्त हें तथ्य. १४.

मोरोपंत.

---

## नमननिरूपण.

### ओंव्या.

जेथें दिसती विशेष गुण तें सद्गुरूचें अधिष्ठान
या कारणें तयासी नमन अत्यादरें करावें. १.
नमस्कारें लीनता घडे नमस्कारें विकल्प मोडे
नमस्कारें सख्य घडे नानासत्पात्रीं. २.
नमस्कारें दोष जाती नमस्कारें अन्याय क्षमिती
नमस्कारें मोडलीं जडती समाधानें. ३.
नमस्कारें कृपा उचंबळे नमस्कारें कृपा प्रबळे
नमस्कारें गुरुदेव वोळे साधकांवरी. ४.
विशेष करितां नमस्कार नासती दोषांचे गिरिवर
आणि मुख्य परमेश्वर कृपा करी. ५.
नमस्कारें पतीत पावन नमस्कारें संतासि शरण
नमस्कारें जन्ममरण दुरी दुरावे. ६.

परम अन्याय करूनि आला आणि साष्टांग नमस्कार घांतला
तरी तो अन्याय क्षमा केला पाहिजे श्रेष्ठीं. ७.
या कारणें नमस्कारापरतें आणीक नाहीं अनुसरतें
नमस्कारें प्राणियातें सुबुद्धि लागे. ८.
नमस्कारासी वेंचावें नलगे नमस्कारासी कष्टावें नलगे
नमस्कारीं कांहीं नलगे उपकरणसामग्री. ९.
नमस्काराऐसें नाहीं सोपें नमस्कार करावा अनन्यरूपें
नानासाधनीं साक्षेपें कासया शिणावें. १०.
या कारणें नमस्कार श्रेष्ठ नमस्कारें वोळती वरिष्ठ
येथें सांगितली स्पष्ट साहावी भक्ती. ११.

रामदास.

---

## तरुणांस उत्तम बोध.

### फटके.

लंडे गुंडे हिरसे तट्टू ह्यांची संगत धरूं नको
नरदेहासी येउनि प्राण्या दुष्ट वासना धरूं नको. ध्रु०.
भंगी चंगी बटकी सटकी यांच्या मेळ्यांत बसूं नको
बिकटवाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको
संसारामधिं ऐस आपुला उगाच भटकत फिरूं नको
बहु सालसपण धरुनि निखालस खोट्या बोला बोलुं नको
परधनपरनार यांस पाहुनी चित्त भ्रमुं हें देउं नको
अंगिं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको
नास्तिकपणांत शिरुनि जनाचा बोल आपणां घेउं नको
भलीभलाई कर कांहीं पण अधर्ममार्गीं शिरूं नको

मायबापांवर रुसूं नको
दूर एकला बसूं नको
व्यवहारामधिं फसूं नको
कधीं रिकामा असूं नको
परि उलाढाली भलत्याभलत्या पोटासाठीं करूं नको. लं० १.
वर्म काढुनी शर्मायाला उणें कुणाला बोलुं नको
बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करून हेवा झटूं नको
मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्वभार हा वाहुं नको
एकाहुनि एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको
हिमामतीच्या बळें गरिबगुरिबाला तूं गुरकावुं नको
दों दिवसांची-जाइल सत्ता अपेश माथां घेउं नको
बहुत कर्जबाजारी होउनि बोज आपला दवडुं नको
स्नेहासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होउं नको
विडा पैजेचा उचलुं नको
उणी तराजू तोलुं नको
गहाण कोणाचें डुबलवुं नको
असल्यावर भिक मागुं नको
नसल्यावर सांगणें कशाला गांव तुझा भिड धरूं नको. लं० २.

अनंतफंदी.

---

## बायको पैशाची.

### श्लोक.

कांतेला पति तोचि मान्य हृदयीं जो का असे जोडका
संपत्तीविण त्यास ती गणितसे जैसा कडू दोडका

जेथें कामिनिचें असे बळ बहू निर्माल्य तेथें पती
ऐसें टाकुनियां सुधाम सहसा जावें अरण्याप्रती. १.

एक जुना कवि.

## पद.

बाइल पैशाची पैशाची विरळागत पुरुषाची. बाइल० ध्रु०.
धनकनकांतर गांठी त्याला समान सांगे गोष्टी. बाइ० १.
नेसवि साडी लुगडीं त्यासी लावी लाडी गोडी. बाइ० २.
भ्रतार वेडापिसा त्याशीं करी नित्य कर्कशा. बाइ० ३.
शिवदिन गुरुचे पायीं पैशावीण कांहिंच नाहीं. बाइ० ४.

शिवदिन.

---

## चालता काळ.

## पद.

बा तुझा चालता काळ खायाला मिळती सकळ. ध्रु०.
हे कोण बायकोचे साले तुपावेगळा घांस न गिळे
तांदुळ रांधावे मोकळे केलें बेबीचें ऊखळ. बा तु०. १.
हे कोण बायकोचे मामे घरांत हिंडती रिकामे
साखर शाल्योदन खाणें भोजनभाऊ केवळ. बा तु०. २.
बहिणी सासू घरास येती फराळाच्या पंक्ति बैसती
नातीं कोरुन कोरुन काढिती सगळा मायेचा गोंधळ. बा तु० ३.
अमृतराय ह्मणे रे मूर्खा नको भुलूं मायेच्या सुखा
अंतीं एकटा जाशी नरका भजें सदगुरू दयाळा. बा तु०. ४.

अमृतराय.

## लावणींतला चुटका.

रांडापोरें वंचक चोरें जंवर मिळवितां तंवर थवा
शितें तंवर तीं भुतें भोंव्रतीं कोण कुणाचा सखा जिवा
जोंवरि पैसा तोंवरि बैसा मंचाकिं ह्मणति ध्याल हवा
बेटा बेटी हतिं नरोटी देतिल हा खुप समज ठिवा.

रामजोशी.

---

## स्वभावास उपाय नाहीं.

### अभंग.

उरा लावी ऊर आलिंगितां कांता
संतासी भेटता अंग चोरी. १.
अतीत देखोनी होय पाठमोरा
व्याह्याशी सामोरा जाय वेगीं. २.
संता नमस्कारी मनीं भाव कैंचा
तुकाचे दासीचा लेख होय. ३
तुका ह्मणे तुह्मीं रागासी न यावें
स्वभावा करावें काय कोणीं. ४.

आधीं होता वाघ्या देवयोगें झाला पाग्या
त्याचें येळकोट राहीना मूळ स्वभाव जाईना. १.
आधीं होता ग्रामजोशी राज्यपद आलें त्याशी
त्याचें पंचांग राहीना मूळ स्वभाव जाईना. २.
आधीं होती दासी पट्टराणी केली तिशी
तिचें हिंडणें राहीना मूळ स्वभाव जाईना. ३.

आधीं होता संतसंग तुका झाला पांडुरंग
त्याचें भजन राहीना मूळ स्वभाव जाईना. ४.

तुकाराम.

---

## ठकास ठक.

### अभंग.

वाघें उपदेशिला कोल्हा सुखें जाऊंदे रे मला. १.
अंतीं मरसी न चुके मज कां मारीतोसी भुके. २.
येरु ह्मणे भला भला तुझे तोंडें निवाड झाला. ३
देह तो जाणार मज घडेल परोपकार. ४
येरु ह्मणे मनीं ऐसें जावें समजोनी. ५.
गांठी पडली ठकाठका त्याचें वर्म बोले तुका. ६.

तुकाराम.

---

## कर्मगति विचित्र.

### श्लोक.

जाळें तोडुनियां बळें हरिण तो टाळोनि दावाग्निला
व्याधाचे चुकवोनि बाणहि महा वेगें पुढें चालिला
तों घाईंत उडी फसोनि पडला आडामधें बापडा
होती निष्पळ यत्न सर्वहि जरी होई विधी वांकडा. १.

कृष्णशास्त्रीचिपळूणकर.

खल्वाट चंडकिरणें अतितप्त झाला
छायार्थ तालतरुमूळसमीप गेला
तत्काळ थोर पडलें फल तो निमाला
ये जेथ दैवहत येइल तेथ घाला. २.

पेटीमाजि निरोधिला न सुटका ज्याला भुकेला फणी
तों केलें बिळ मूषकें अवचितां तो आंत गेला क्षणी
त्यातें भक्षुनि सर्प तत्कृतपथें निश्चित गेला पहा
ऐसें कर्म अतर्क्य यास्तव तुह्मी कीं स्वस्थ चित्तें रहा. ३.

वामन.

## एकाच प्रसंगांत सर्वरसप्रदर्शन.

कंसवधाच्या वेळीं कृष्ण कोणाकोणास कसा दिसला, त्याचें वर्णनः—

### श्लोक.

भिन्न भिन्न मतिच्या अवलोकीं
देखिला कस कसा रस लोकीं
श्लोक एकचि वदे शुकराया
जे रसज्ञ तिंहिं अर्थ कराया. १.

मल्लां वज्र गमे नरां नृप गमे काम स्वयें स्त्रीजनां
गौळ्यां आप्त नृपां खळां प्रभुशिशू मातापित्यांच्या मना
कंसा मृत्यु अशक्त पामरजना संतांसि तत्वामृत
श्रीशेषासन यादवां हरि दिसे रंगांत रामान्वित. २.

दे मल्लां रस रौद्र अद्भुत नरा शृंगार नारी जनां
गौळ्यां हास्य नृपांस वीर करुणा मातापित्यांच्या मना
कंसालागिं भयानकाख्य रस दे बीभत्स मूढा भ्रमें
संतां शांतिरस स्वभक्तिरस तो दे यादवां या क्रमें. ३.

वामन.

---

## ल्याहावें कसें.

### ओंव्या.

ब्राह्मणें बालबोध अक्षर घडसून करावें सुंद्रर
जें देखतांचि चतुर समाधान पावती. १.
वाटोळें सरळ मोकळें वोतलें मसीचें काळें
कुळकुळीत ओळी चालिल्या ढाळें मुक्तामाळा जैशा. २.
अक्षर मात्र तितुकें नीट नेमस्त पैस काने नीट
आडव्या मात्रा त्याही नीट अर्कुलीं वेलांट्या. ३.
पहिलें अक्षर जें काढिलें ग्रंथ संपेतों पहात गेलें
एक टांकेंचि लिहिलें ऐसें वाटे. ४.
अक्षरांचें काळेपण टांकाचें ठोंसरपण
तैसेंचि वळण वांकण सारखेंचि अवघें. ५.
ओळीस ओळ लागेचिना अर्कुलें मात्रा भेदीना
खालींचे ओळीस स्पर्शेना अथवा लंबाक्षर. ६.
पान शिशानें रेखाटावें त्यावरी नेमस्त ल्याहावें
दूरीजवळी न व्हावें अंतर ओळींचें. ७.
कोठें शोधासि अडेना चुकी पाहतां सांपडेना
गरज केली हें घडेना लेखकापासुनी. ८.
ज्याचें वय आहे नूतन त्यानें ल्याहावें जपून
जनास पडे मोहन ऐसें करावें. ९
बहु बारीक तरुणपणीं कामा नये ह्मातारपणीं
मध्यम लिहिण्याची करणी केली पाहिजे.

भोंवतें स्थळ सोडून द्यावें मध्येंच चमचमीत ल्याहावें
क़ागद झडतांहि झडावें न लगेचि अक्षर. ११.
ऐसा ग्रंथ जपून ल्याहावा प्राणिमात्रास उपजे हेवा.
ऐसा पुरुष तो पहावा ह्मणती लोक. १२.
नाना गोफ नाना बासनें मेणकापडें सिंधुरवर्णें
पेट्या कुलपें जपणें पुस्तकांकारणें. १३.

रामदास.

---

## व्यंग होणें बरें; पाप नको.

### अभंग.

पापाची वासना नको देऊं डोळां
त्याहूनी आंधळा बराच मी. १.
निंदेचें श्रवण नको माझे कानीं
बधिर करूनी ठेवीं मज. २.
अपवित्र वाणी नयो माझ्या मुखा
त्याजहूनी मुका बराच मी. ३.
नको मज कधीं परस्त्रीसंगती
जनांतून माती उठतां भली. ४.
तुका ह्मणे मज अवघ्यांचा कंटाळा
तूं एक गोपाळा आवडसी. ५.

तुकाराम.

---

## मृत्यूची व्यापकता.

### ओंव्या.

मृत्यु न ह्मणे कीं हा क्रूर मृत्यु न ह्मणे हा झुंजार
मृत्यु न ह्मणे संग्रामशूर समरांगणीं. १.
मृत्यु न ह्मणे हा बलाढ्य मृत्यु न ह्मणे हा धनाढ्य
मृत्यु न ह्मणे हा आढ्य सर्व गुणें. २.
मृत्यु न ह्मणे हा विख्यात मृत्यु न ह्मणे हा श्रीमंत
मृत्यु न ह्मणे हा अद्भुत पराक्रमी. ३.
मृत्यु न ह्मणे हा भूपति मृत्यु न ह्मणे हा चक्रवर्ती
मृत्यु न ह्मणे हा करामती कैवाड जाणे. ४.
मृत्यु न ह्मणे हा व्युत्पन्न मृत्यु न ह्मणे हा संपन्न
मृत्यु न ह्मणे हा विद्वज्जन समुदायीं. ५.
मृत्यु न ह्मणे हा धूर्त मृत्यु न ह्मणे हा बहुश्रुत
मृत्यु न ह्मणे हा पंडित महाभला. ६.
एक मृत्युमार्गीं लागले एकीं अर्ध पंथ क्रमिले
एक ते शेवटास गेले वृद्धपणीं. ७.
आतां असो हें बोलणें मृत्यूपासूनि सुटिजे कोणें
मागें पुढें विश्वास जाणें मृत्युपंथीं. ८.
श्रोत्रीं कोप न करावा हा मृत्युलोक सर्वांस ठावा
उपजला प्राणी जाईल अवघा मृत्युपंथें. ९.
ऐसें जाणोनियां जीवें याचें सार्थकचि करावें
जनीं मरोनि उरावें कीर्तिरूपें. १

रामदास.

# फुलांची परडी आणि रसिकजन.

## श्लोक.

पुष्पांनीं परडी-भरोनि विविधां ही मीं पुढें ठेविली
मर्मज्ञीं रसिकीं कृपा करुनियां ती पाहिजे सेविली
तेणें सार्थकता तयां उभयतां लाधेल सर्वोपरी
ही नोहे नव कीं जुनी कविजनीं सांगीतली वैखरी.